


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

## निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ५२ । अंक ९ । जून १९९९
अ.ज्येष्ठ–नि.ज्येष्ठ, शके १९२०
किंमत रु. ३०/-
वार्षिक वर्गणी रु. २००/-



## *नवभारत*ची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

* *नवभारत*, ऑक्टोबर, १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



**संपादकीय पत्रव्यवहार :**
वसंत पळशीकर
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळामंडळ,
वाई – ४१२ ८०३ (जि. सातारा).

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**
श्री.ग. दीक्षित
व्यवस्थापक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळामंडळ, ३१५ गंगापुरी,
वाई – ४१२ ८०३ (जि. सातारा)



अनुक्रमणिका

# नवभारत

अ नु क्र म



मुखपृष्ठ : सुजित पटवर्धन








# अंधश्रद्धा निर्मूलन समितीची भूमिका

'अंधश्रद्धानिर्मूलनाच्या कार्यातले पथ्यापथ्य' (*नवभारत*, जानेवारी १९९९) या संपादकीयाचा अंधश्रद्धा निर्मूलन समितीचे (*अंनिस*) एक प्रथमपासूनचे कार्यकर्ते श्री. टी.वी. खिलारे यांनी केलेला प्रतिवाद या अंकात अन्यत्र प्रकाशित केला आहे. प्रथमतः, त्यांच्या प्रतिसादावद्दल आम्ही त्यांचे आभार मानतो.

त्यांच्या लेखातील मुख्य मुद्यांकडे वळण्याआधी त्यांच्या एका शेऱ्यावद्दल सखेद निषेध व्यक्त करावयाचा आहे. एका ठिकाणी ते म्हणतात, "भर वाजारातून जाणाऱ्या ट्रकमागे जशी स्कूटर भुर्रकन निघून जात असते, त्याचप्रमाणे मान्यवर विचारवंतांचे शेपूट धरून जाणारे काही छोटे तथाकथित विचारवंत असतात. अशा काही तथाकथित विचारवंतांना समितीची (*अंनिस*) लाक्षणिक अर्थाने चोरी करून सत्य शोधण्याची भूमिका मान्य नाही." 'महाराष्ट्र टाइम्स' या दैनिकात श्री. अरुण ठाकूर यांनी 'चला, शनि-शिंगणापुरला चोरी करायला' या *अंनिस*ने दिलेल्या 'हाके' विरुद्ध भूमिका घेणारा लेख लिहिलेला आमच्या वाचण्यात आहे. याला उद्देशून वरील शेरेवाजी श्री. खिलारे यांनी केली का? कोणालाही डोळ्यासमोर ठेवून त्यांनी लिहिलेले असो, अशी हेटाळणी करीत लिहिणे वा वोलणे हे गैर आहे असे आम्हाला म्हणावयाचे आहे.

आम्ही उपस्थित केलेल्या एका मुद्द्यावद्दल श्री. खिलारे यांचा गैरसमज झालेला आहे. आमचे विधान पुढीलप्रमाणे होते : "अंधश्रद्धा निर्मूलन समिती/चळवळ यामध्ये सक्रिय असणाऱ्या कार्यकर्त्यांवद्दल सर्वसाधारण धारणा हीच दिसते की, ते स्वतःला विज्ञाननिष्ठ म्हणविणारे, बुद्धिप्रामाण्यवादी म्हणविणारे आणि धर्म नावाची गोष्ट, विशेषतः हिंदुधर्म नावाची गोष्ट मोडीत काढू इच्छिणारे आहेत; किमानपक्षी, हिंदुधर्माविषयी अनादर, तुच्छभाव वा सर्वसाधारण खंडन करण्याची दृष्टी वाळगणारे तर नक्कीच आहेत." श्री. खिलारे यांनी हे विधान, एक तर, पूर्ण उद्धृत केलेले नाही. **ही सर्वसाधारण धारणा** वरीचशी वस्तुनिष्ठ आहे, असे लगेचच पुढच्या वाक्यात म्हटले होते. धर्माविषयी, विशेषतः हिंदुधर्माविषयी जे मत, जी भावना, व जी दृष्टी *अंनिस*चे कार्यकर्ते वाळगतात ती 'वस्तुनिष्ठ' आहे असे आम्ही म्हटले नव्हते; तर, लोकांमध्ये जी धारणा सर्वसाधारण आहे ती वस्तुनिष्ठ आहे असे आम्ही म्हटले होते. या दोहोंमध्ये फरक आहे.

श्री. खिलारे यांच्या प्रतिसादामधून एक गोष्ट मात्र स्पष्ट होते ती ही की, लोकांची *अंनिस*च्या कार्यकर्त्यांविषयीची धारणा आणि श्री. खिलारे यांच्यासारख्या जुन्या निष्ठावान कार्यकर्त्यांची स्वतःविषयीची धारणा ही एकच आहे.

आता, जे जे वस्तुनिष्ठ ते ते योग्य असे आपोआपच ठरत नाही. उदाहरणार्थ, 'पृथ्वी गोल आहे' हे म्हणणे 'वस्तुनिष्ठ' आहे; पण पृथ्वीचे गोल असणे हे योग्य की अयोग्य हा प्रश्न निरर्थक आहे. 'आजही वहुसंख्य ब्राह्मणांना पूर्वास्पृश्य, शूद्र वा आदिवासी हे वुद्धीने कमीच आहेत असे वाटते' हे विधान, एक विधान म्हणून, 'मताची चाचपणी' केल्यास वस्तुनिष्ठ ठरेल अशी शक्यता आहे. पण ही त्यांची धारणा योग्य आहे असे त्या कसोटीवर ठरणार नाही.

*अंनिस*चे कार्यकर्ते स्वतःस आत्मगौरवपूर्वक विज्ञाननिष्ठ, बुद्धिप्रामाण्यवादी म्हणवितात. विज्ञानाच्या विषयांमधील 'सत्य' शोधून काढण्याची रीत, 'पुराव्यासह सिद्ध' करावयाची रीत विज्ञानाच्या परिसीमांवाहेरील विषयांमध्ये लागू होत नसेल तर 'विज्ञाननिष्ठ' असण्याचा अर्थ, विज्ञानाच्या विषयांमध्ये वैज्ञानिक रीतीचा चोख अवलंव करण्यावर निष्ठा ठेवणे एवढाच होईल. मी या देशातील ख्रिश्चन वा मुस्लिम जनांना माझे वंधू मानावे की त्यांच्याविषयी शत्रुत्व वाळगावे, कोणती गोष्ट योग्य व चांगली होईल, याविषयी विज्ञाननिष्ठा मात्र काही सांगू शकत नाही. कोणती वृत्ती वाळगणे सोयीचे, स्वार्थाचे, सावध व दक्ष धोरणीपणाचे वा व्यावहारिक शहाणपणाचे होईल याचे 'वस्तुनिष्ठ' उत्तर स्थलकालपरिस्थिती, व्यक्तीची उद्दिष्टे, क्षमता, सामर्थ्य, वगैरे वावी लक्षात घेऊन देता येईल. पण ते विज्ञाननिष्ठ म्हणता येत नाही. पण ते योग्य, नैतिक आपोआप ठरेल असेही नाही. 'बुद्धिप्रामाण्यवादी' हा शव्द फसवा आहे. अविवेकी माणूसही अविवेकाने वागत असताना, तशा वागण्याचे समर्थन करीत असताना बुद्धीचा वापर करतो. 'इंद्रियानुभवप्रामाण्यवादी' (empiricial) हा शव्द जास्त योग्य

ठरेल. पण तात्त्विक व व्यावहारिक, दोन्ही दृष्ट्या या भूमिकेच्या मर्यादा ध्यानात घेतल्या तर, 'आम्ही विज्ञाननिष्ठ, बुद्धिप्रामाण्य-वादी आहोत' असे म्हणण्याने आपल्या मर्यादाच आपण जाहीर करीत असतो ही गोष्ट *अंनिस*च्या कार्यकर्त्यांच्या ध्यानात येईल तो सुदिन होय असे आम्हाला वाटते.

बहुसंख्य *अंनिस* कार्यकर्त्यांची धर्म या गोष्टीविषयीची जाण आम्हांला असमंजस व उथळ वाटते. उदाहरणार्थ, श्री. खिलारे यांच्या प्रतिसादामध्ये पुढील वाक्य येते : "युरोपच्या प्रबोधनाच्या चळवळीचा – मुक्त विचाराचा – बुद्धिप्रामाण्यवादी विचारसरणीचा वारसा समिती चालवत असल्यामुळे धर्मासारख्या जन्माने चिकटलेल्या अविवेकी गोष्टीची चौकट किंवा बंधन मानण्याचे काही कारण नाही." युरोपीय प्रबोधन-चळवळीची भलावण करताना "प्रबोधन काळात परंपरागत धर्म, धार्मिक श्रद्धा व धर्मसंस्था यांचे वर्चस्व झुगारून देण्यात आले. बुद्धीच्या विचारस्वातंत्र्याला सार्वभौम महत्त्व देण्यात आले." यातले पहिले विधान ठीक आहे. समिती प्रबोधनयुगाचा ('एनलाय-टनमेंट') वारसा चालवावा हे ठरविण्यास मोकळी आहे.* दुसरे विधान, युरोपात सामाजिक व्यवहारांच्या पातळीवर काय घडले हे सांगणारे आहे. हे अर्धसत्य सांगणारे विधान आहे. समाजजीवनातले धर्म, धार्मिक श्रद्धा व धर्मसंस्था यांचे सर्वंकष वर्चस्व संपुष्टात जरूर आले. पण धर्म, धार्मिक श्रद्धा व धर्मसंस्था यांचे स्थान व महत्त्व कमी झाले का? आता, जर आजही युरोप-अमेरिकेतील लोकसंख्येतील नास्तिक लोकांचे प्रमाण पाहिले तर ते नगण्य ठरेल. हिंदू समाजात धार्मिक असण्यासाठी ईश्वरनिष्ठ/भक्त असण्याची गरज नाही. पाश्चिमात्य ख्रिश्चन देशांत व्यक्ती या स्वरूपात ईश्वराचे अस्तित्व (God as a person) मान्य असल्याशिवाय कोणी धार्मिक असू शकत नाही. ज्या 'वस्तुनिष्ठते'चे श्री. खिलारे यांना इतके कौतुक आहे त्या कसोटीवरदेखील 'धर्म' ही गोष्ट *अंनिस*च्या कार्यकर्त्यांनी मनाची कवाडे उघडी ठेवून समजून घेण्याची गरज आहे.

'स्वाध्याय' चळवळ, संत श्रीगाडगेबाबा, सानेगुरुजी यांचे उदाहरण आम्ही का दिले हे श्री. खिलारे यांनी समजून घेतलेले नाही. श्री. पांडुरंगशास्त्री आठवले यांचे व्यक्तित्व आणि त्यांची 'स्वाध्याय' चळवळ यांमध्ये मतभेदाचे, आक्षेप घेण्याजोगे, निषेध व्यक्त करण्याजोगे मुद्दे नाहीत असे नाही, ही गोष्ट आमच्या लेखातही आम्ही स्पष्ट केली होती. आमचा मुद्दा हा होता व आहे की, लोकांच्या धार्मिक असण्यावरच हल्ला न करता, उलटपक्षी त्यांचे धार्मिक असणे सहृदयतेने समजून घेऊन, तिला योग्य अवकाश राखून घातक अंधश्रद्धांचे उच्चाटन करता येऊ शकते, व ही भूमिका *अंनिस*ने घेणे तात्त्विक व व्यावहारिक, दोन्ही पातळ्यांवर *अंनिस*च्या कार्यासाठीही उपकारक ठरेल.

या प्रकारची समंजस भूमिका *अंनिस*ने अलीकडे, एका मर्यादेपर्यंत, ईश्वरोपासनेविषयी घेतली आहे. ही गोष्ट ठसावी म्हणून डॉ. नरेंद्र दाभोलकर व डॉ. श्रीराम लागू यांच्या 'जुगलबंदी'छाप सभाही महाराष्ट्रभर आयोजित केल्या गेल्या. पण ही भूमिका सखोल, प्रगल्भ जाण उत्पन्न झाल्याची निदर्शक नाही असे दिसते. श्री. खिलारे एका ठिकाणी म्हणतात, "अंधश्रद्धा, व्यवहार व लोक यात भेद करता येत नाही." आमचा एक मुद्दा असाही होता (व आहे) की, लोकांविषयी सहृदय सहानुभाव *अंनिस*च्या कार्यकर्त्यांच्या ठायी ओतप्रोत असणे ही एक पायाभूत आवश्यकता आहे.

तात्पर्य, आमच्या मनात *अंनिस*च्या कार्यकर्त्यांविषयी कटुता नाही, पण खेदाची भावना जरूर आहे.

श्री. खिलारे यांनी शनि-शिंगणापुरच्या कार्यक्रमाविषयी लिहिले आहे. आमच्या संपादकीयाला या कार्यक्रमाची व त्याविषयीच्या चर्चेची लगेचची पार्श्वभूमी होती ही गोष्ट खरीच आहे. शनि-शिंगणापुरात जो कार्यक्रम हाती घेतला त्याबद्दल थोडा विचार करूया.

'घराला दारे नसतानाही चोऱ्या होत नाहीत; चोऱ्या झाल्याच तर चोरांचे डोळे जातात', ही शनि-शिंगणापुरच्या मंडळींची श्रद्धा आंधळी आहे असे गृहीत धरून चर्चा करूया. कारण, श्रद्धा 'आंधळी' कशी व केव्हा असते याचा निवाडा करणे ही श्री. खिलारे यांना वाटते तितकी सोपी गोष्ट नाही. प्रत्येकच श्रद्धा ही निरपवादपणे आंधळीच असते, आणि जी गोष्ट आंधळी असते ती घातक असते, अशी भूमिका असणाऱ्यांच्याच भूमिकेमधून विचार करू. शनि-शिंगणापुरच्या लोकांच्या प्रबोधनाचे भरपूर प्रयत्न *अंनिस*ने केले असेही गृहीत

* याही संदर्भात, श्री. दि.के. बेडेकर यांच्या *धर्मश्रद्धा – एक पुनर्विचार* या पुस्तकात बेडेकरांनी केलेले विवेचन महत्त्वाचे आहे. प्रबोधनयुगाचा वारसा डोळस चिकित्सकपणे चालविणे व पुढे नेणे म्हणजे काय हे मग स्पष्ट होईल.



अनुक्रमणिका

धरू. पण म्हणून 'चला चोरी करायला' अशा कार्यक्रमाचे आयोजन करणे कितपत योग्य ठरते?

लोकांच्या ठायीची ही पारंपरिक श्रद्धा विरून गेली असेल तर शनि-शिंगणापुरला, अन्यत्र घडतात तशा, चोऱ्या आजकाल व्हायला लागल्या असणार. शनि-शिंगणापुरला चोऱ्या होतात, चोरी करणाऱ्यांचे डोळे जात नाहीत, चोर पकडले जाऊन त्यांना आजच्या कायद्यानुसार शिक्षा होतेच असेही नाही, या गोष्टी त्या गावातल्या लोकांच्या अनुभवाच्या, परिचयाच्या असणार. याचा परिणाम दोन प्रकारचा झाला असेल अशी आपण अपेक्षा करू शकतो. एक, लोक आपल्या घरादारांना कुलुपे घालायला लागलेले, मालमत्तेचे संरक्षण करायला लागलेले आढळतील. चोरी करण्याची प्रवृत्ती, वा गरज, असणाऱ्यांची जोवर डोळे जाण्याविषयी श्रद्धा टिकून असेल तोवरच लोक दारे उघडी टाकून व्यवहार करणार. पण याचे स्पष्टीकरण लोक श्रद्धेला धक्का न लावताही देऊ शकतात. म्हणजे ते म्हणू शकतात की, ज्यांच्या घरांमध्ये चोरी होते ते लोक खऱ्या अर्थाने भाविक राहिलेले नाहीत, ते पापाचरणी झालेले आहेत आणि म्हणून आज अशांच्या घरी चोरी करणाऱ्यांचे काही वाईट होत नाही.

चोरी करूनही जर चोरांचे वाईट होत नसेल तर आपण मानीत आलो तेवढा देव हा शक्तिमान नसतो, अशी लोकांची भावना होऊ शकते. दुसरा परिणाम असा होऊ शकतो. *अंनिस*च्या कार्याचा परिणाम म्हणून दुसऱ्या प्रकारचा परिणाम व्हायला हवा. मग गेली तीन वर्षे अखंडपणे प्रबोधनाचे कार्य करूनही ते निष्प्रभ का ठरले आहे, हा प्रश्न पडतो.

भाविकांची व पर्यटकांची जाणीवपूर्वक व पद्धतशीरपणे दिशाभूल केली जाते, त्यांचे शोषण केले जाते, असे श्री. खिलारे यांनी म्हटले आहे. 'चला चोरी करायला' या कृती-कार्यक्रमाने साध्य कसे गाठले जाणार होते? 'न्याययंत्रणा जी शिक्षा देईल ती भोगायला आम्ही तयार होतो' असे श्री. खिलारे यांनी म्हटले आहे. जो भ्रम दूर करावयाचा आहे तो शनि-शिंगणापुरच्या दैवताच्या शक्तीविषयीचा आहे; ते दैवत सांगूनसवरून चोरी करणाऱ्याला कोणतेच शासन करू शकले नाही, हे लोकांना दिसणे आवश्यक व महत्त्वाचे ठरते. पोलिसांनी पकडणे व न्यायालयाकडून शिक्षा होणे या गोष्टी अप्रस्तुत आहेत. 'आम्ही चोरी करायला येत आहोत, पण आम्ही खरे चोर नाही. पाहा, आम्ही तुमच्या गावात येऊन ही ही चोरी केली; आता तुमचे दैवत शिक्षा – डोळे घालविण्याची – करते का बघूया.' असा या कृतीचा आकार आहे. यामध्ये आणखीही गुंतागुंत आहे. शनि-शिंगणापुरचे दैवत या प्रकारे स्वतःची शक्ती प्रकट करते, ही त्या दैवताची शक्ती आहे, असा भ्रम काही व्यक्ती वा लोक दिशाभूल करून शोषण करता यावे म्हणून पसरवीत आले आहेत, असाही आरोप ठेवलेला आहे. म्हणजे, *अंनिस*च्याच म्हणण्याप्रमाणे, दैवत स्वतः होऊन कोणताच दावा करीत नाही; त्याचे नाव घेऊन लबाड धंदेवाईक लोक हा दावा करीत आहेत. शनि-शिंगणापुरच्या दैवताची भाविकपणे पूजा करण्यासाठी लोकांनी येण्याला *अंनिस*ची अजिबात हरकत नाही, पर्यटकांनीही हवे तर गर्दी करण्यास हरकत नाही; फक्त हा लबाडपणे पसरविलेला भ्रम न बाळगता लोकांनी यावे, असे *अंनिस*चे म्हणणे असायला हवे. पण अशी कृती तर लोकांच्या भाविकतेची सरळसरळ पुष्टी करणारी ठरेल. *अंनिस* काय करीत आहे? तर 'जाणूनबुजून व पद्धतशीरपणे' पसरविण्यात आलेल्या भ्रमाचा फायदा 'जाणूनबुजून व पद्धतशीरपणे' (?) उठवून दैवताला 'दाखव तुझी शक्ती' असे आव्हान देत आहे. म्हणजे, या कृतीपुरता तरी, हा पसरविण्यात येणारा भ्रम नसून, दैवत ही शक्ती स्वतःच्या ठायी असल्याचा दावा करीत आहे, अशी भूमिका *अंनिस* स्वतः घेते असा अर्थ होतो. आणि, पर्यायाने, शनि-शिंगणापुरच्या दैवताच्याच ठायी नव्हे तर अशा कोणत्याही दैवताच्या ठायी कोणतीच शक्ती नसते हे दाखवून देणे हे या कृतीचे उद्दिष्ट बनते.

आता, आणखी पुढची गुंतागुंत लक्षात घेऊया. *अंनिस*च्या स्वतःच्या भूमिकेनुसार, अशी दैवते ही माणसानेच जन्माला घातलेली आहेत. माणसांनीच त्यांच्या ठायी लहानमोठी शक्ती कल्पिलेली आहे. म्हणजे 'दाखव तुझी शक्ती, घालव आमचे डोळे' हे आव्हान झेलणारी कोणी शक्ती (*अंनिस*च्या मते) पलीकडे नाहीच. हे आव्हान, हा धक्का त्या दैवताला बसणार नसतो; तो भाविकांना बसावा अशीच योजना असते. ते भाविकांना दिलेले आव्हान ठरते.

*अंनिस*च्या कृतीची तुलना श्री. खिलारे यांनी गांधींच्या मीठाच्या सत्याग्रहाच्या कायदेभंगाच्या कृतीशी तसेच डॉ. आंबेडकर यांच्या मंदिरप्रवेशाच्या सत्याग्रहाशी केली आहे. पण ती अप्रस्तुत आहे. जो कायदा शासनाने केलेला आहे म्हणून वस्तुतः त्याचे पालन नागरिकांनी करावयास हवे तो,

'उच्चतर नैतिक कायद्याचे पालन करणे हे प्रथम कर्तव्य आहे' या भूमिकेमधून मोडावयाचा ही गांधींची भूमिका होती. आमच्या माहितीप्रमाणे मीठाच्या उत्पादनाची मक्तेदारी सरकारने स्वतःच्या हाती ठेवली होती. समुद्राच्या पाण्यातले मीठ ही हवा, पावसाचे, ओढे-नद्या यांमधील पाणी यांसारखी निसर्गाची देणगी असताना, स्वतःचे उत्पन्न वाढविण्यासाठी सरकारने आपली मक्तेदारी प्रस्थापित करावी आणि गरीबातल्या गरीबालाही लागणाऱ्या मीठासारख्या अत्यावश्यक अशा वस्तूवर कर लादावा ही गोष्ट गांधींच्या मते उच्चतर नैतिक कायद्याच्या विरोधातली होती. श्री. खिलारे म्हणतात त्याप्रमाणे हा कायदा लाक्षणिक (token) अर्थाने मोडावयाचा नव्हता. मीठाचा कायदा मोडणे ही token कृती कोणत्या अर्थाने होती? तर, ब्रिटिशांची परकीय राजवट हीच उच्चतर नैतिक कायद्याच्या विरोधी आहे; त्या राजवटीलाच न जुमानण्याच्या व्यापक, सर्वंकष भूमिकेचे token म्हणून कायदा मोडून मीठाचे उत्पादन करावयाचे होते. तेव्हा, श्री. खिलारे यांची समजूत चूक आहे. या कारणाने मीठाच्या कायद्याच्या भंगाशी 'चला चोरी करायला' या कृतीची तुलना करणारा युक्तिवाद लंगडा पडतो. शनि-शिंगणापुरच्या परिस्थितीत मामला (*अंनिस*च्या दृष्टिकोनामधून) एका अंधश्रद्धेचा होता. देवच नसतो, आणि असला तरी त्याच्या ठायी चोरी केल्यास डोळे घालविण्याची शक्ती नसते; **डोळे जातील या भीतीपोटी चोरी न करण्यापेक्षा, चोरी (करावीशी वाटली तर) निर्भयतेने ती करावी हा उच्चतर नैतिक कायदा होय**, अशी *अंनिस*ची भूमिका होती का, आहे का? नसावी. *अंनिस*ची भूमिका अशीच असू शकते की, योग्यायोग्य, इष्टानिष्ट विवेक माणसांनी स्वतः करावा आणि अशा विवेकनिष्ठ नीतीचे पालन कर्तव्यभावनेने करावे. या भूमिकेमधून कोणता कृती-कार्यक्रम हाती घेणे योग्य ठरले असते? 'चला चोरी करायला' हा तो कार्यक्रम होऊ शकतो असे आम्हांला वाटत नाही.

बाबासाहेब आंबेडकरांनी मंदिरप्रवेशाची 'चळवळ' ज्या काळात केली त्या काळात, आमच्या समजुतीप्रमाणे तरी, त्यांनी धार्मिकतेविरुद्ध पवित्रा घेतलेला नव्हता. पूर्वास्पृश्यांची देवावरची श्रद्धा त्यांनी लोकांच्या जगण्याचा, धार्मिक असण्याचा भाग म्हणून स्वीकारलेला होता. त्यांचे आव्हान कोणत्याही दैवताला नव्हते; तर, दैवताला थेट मंदिरात जाऊन भेटण्याच्या आड येणाऱ्या शास्त्रार्थाला आणि तो शास्त्रार्थ उचलून धरणाऱ्या सनातन्यांना होते. आणि मंदिरात प्रवेश करून दैवताची पूजा करण्याची मोकळीक हा उच्चतर नैतिक कायदा ही त्यांची भूमिका होती. म्हणून गांधींच्या सत्याग्रहाच्या धर्तीवर त्यांनी काही सत्याग्रही कृतींचे नेतृत्व केले.

*अंनिस*च्या कार्यकर्त्यांनी शनि-शिंगणापुरला चोरी करण्याचा कार्यक्रम पार पाडला असता तर काय घडले असते? आमचे म्हणणे असे की, जागेवर खरी परिस्थिती काय आहे याविषयी **त्या गावात राहणाऱ्या** व्यक्तींना भ्रम असेल असे वाटत नाही. त्या स्थानाचे माहात्म्य वाढवून, भाविक यात्रेकरू व पर्यटक यांना मोठ्या संख्येने आकृष्ट करून नफेशीर धंदा करू म्हणणारी अशी जी मंडळी असतील ती गावाबाहेर भ्रम पसरवीत असणार. *अंनिस*च्या तीन वर्षांच्या कार्याने या लोकांचा भ्रम का दूर होऊ शकला नाही, हा प्रश्न श्री. खिलारे यांनी उपस्थित करावयास हवा. आज सर्वसाधारण चित्र असे दिसते की, अशी धार्मिक स्थळे ही वाढत्या प्रमाणावर गर्दी खेचीत आहेत. येथे येणारे लोक भाविक असतात, त्याच वेळी पर्यटकही असतात. त्यांची भाविकताही आधुनिक स्वरूपाची व आशयाची असते. या भाविकतेला व्याज-भाविकता असे म्हणणे योग्य होणार नाही खरे, पण ती त्यांच्या नेहमीच्या लौकिक जीवनाला बाहेरून चिकटविल्यासारखी ठरत आहे; तिच्यात एक उथळपणा आहे. शनि-शिंगणापुरला चोऱ्या होतात, चोरांचे डोळे जात नाहीत, हा प्रचार त्यांना परावृत्त करील ही शक्यता कमी. तसेच 'चला चोरी करायला' ही मोहीम यशस्वी झाली तरी त्यांचा पर्यटक धर्तीचा भाविक उत्साह कमी होईल असे नाही. दैवतांच्या भक्तीचे निमित्त करून ही भाविक-पर्यटक मंडळी अशा ठिकाणी गर्दी करीतच राहतील.

चोरी केल्यास दृष्टी जाते ही समजूत शनि-शिंगणापुरच्या दैवताच्या शक्तीच्या संदर्भात कशी उत्पन्न झाली? ती किती जुनी आहे? अशा समजुती, श्रद्धा या स्थानिक लोकधर्मांचा (folk religionचा) भाग असल्याचे दिसते. ही श्रद्धा जे लोक पूर्वापार बाळगत आले ते जाणूनबुजून 'सत्य लपवीत होते' असे म्हणणे बरोबर होईल का? धर्माच्या क्षेत्रातील अशा सर्व श्रद्धा, रूढी, विधी इत्यादी या ब्राह्मणांनी स्वतःच्या तुंबड्या भरण्यासाठी शोधून काढलेल्या, लोकांमध्ये रुजवलेल्या गोष्टी आहेत, व त्या हेतूने ब्राह्मणांनी लोकांपर्यंत सत्य पोचू दिलेले नाही या म्हणण्याला आधार काय? दैवताची ख्याती पसरून, अशा जागृत व शक्तिमान दैवताची कृपा संपादन करण्यासाठी भाविक मंडळींचा ओघ मोठ्या प्रमाणावर सुरू






झाल्यावर दैवताच्या माहात्म्यामध्ये आर्थिक-सामाजिक हितसंबंध उत्पन्न होतात, आणि ते जपण्यासाठी, धंदेवाईक वृत्तीने, माहात्म्य वाढविण्यासाठी आणखी गोष्टी, त्या खऱ्या नाहीत हे माहीत असूनही, भरीला सांगितल्या जाऊ लागतात, असे म्हणता येते. पण यात केवळ ब्राह्मणांचाच हात असतो वा कावा असतो असे का म्हणावे? कारण अशा क्षेत्रातल्या नाना जातीच्या मंडळींचे स्थानमाहात्म्य वाढण्यात हितसंबंध उत्पन्न होतात. पण श्री. खिलारे यांना एक ब्राह्मणच दोषी आढळतात. याला आधार काय? असे विचारल्यास ते बहुधा महात्मा फुल्यांचा दाखला देतील. पण महात्मा फुले यांची एतत्संबंधीची मीमांसा अंशतः तरी अनैतिहासिक व अशास्त्रीय आहे.

तात्पर्य असे की, 'चोरी करायला शनि-शिंगणापुरला चला' या कृती-कार्यक्रमाची आखणी लोकप्रबोधनाच्या दृष्टीने उपयोगी व मौलिक अशी कृती नव्हती. *अंनिस*च्या कार्यकर्त्यांना आकृष्ट करील अशी मात्र ही हाक व कृती होती. ती शनि-शिंगणापुरच्या दैवताच्या शक्तीला आव्हान देणारी कृती जरूर होती. पण असा धक्का देण्यासाठीही 'चोरी करायला चला' हे म्हणणे, किमानपक्षी, असमंजसपणाचे द्योतक होते असे म्हणावे लागते.

काही श्रद्धा अंध व घातक, दोन्ही असतात. काही विचारपूर्वक न स्वीकारलेल्या तर संस्कारांमुळे अंगी बाणलेल्या या अर्थाने 'अंध' असतात, पण घातक असतातच असे नाही. काही, विवेकाधिष्ठित या अर्थाने, डोळस व विधायक श्रद्धाही असतात. अशा प्रकारचा भेद *अंनिस*च्या बहुसंख्य कार्यकर्त्यांना मान्य नाही अशी छाप उमटते. देवावरची श्रद्धा ही बहुतेकांच्या बाबतीत संस्कारांमधून स्वीकारलेली असते आणि या अर्थाने ती 'अंध' असते. पण ती निरपवादपणे घातक असते असे म्हणता येत नाही. *अंनिस*ने व्यवहारात ही भूमिका आज स्वीकारलेली दिसते. पूर्ण विचारांती एक ना एका रूपातील 'ईश्वरी शक्ती'वर श्रद्धा ठेवणारे आज अनेक वैज्ञानिक आहेत, तत्त्वज्ञ आहेत.

आमचा मुद्दा थोडा वेगळा आहे. *अंनिस* ज्यांचा उल्लेख अंधश्रद्धा, घातक अंधश्रद्धा म्हणून करते त्या श्रद्धा बाळगणारे जे सच्चे भाविक लोक आहेत त्यांच्या लेखी त्या निखळ श्रद्धा असतात. त्या श्रद्धा माणसे प्रांजळपणे, चांगल्या, उपकारक म्हणून बाळगून असतात. अंध व घातक आहेत हे कळून-सवरूनही लोक त्या बाळगतात असे नाही. त्या कोणी लादलेल्या असतात असे नाही. संस्कारांमधून स्वीकारलेल्या श्रद्धा आणि लादलेल्या श्रद्धा यात फरक करावयास हवा. किंबहुना, अमुक एक समजूत प्रमाण म्हणून स्वीकारण्याची सक्तीच आहे असे जर भान उत्पन्न झाले वा मत बनले तर ती समजूत श्रद्धा या पदाला पोचतच नाही. दैवते व त्यांच्या ठायी असलेली शक्ती हा श्रद्धेचा विषय आहे. लोकांच्या या श्रद्धा अंध व घातक आहेत असा *अंनिस*चा निवाडा असू शकतो. याला आमचा विरोध नाही. अशा श्रद्धांविरुद्धचा संघर्ष हा, लोक यांना अंध व घातक मानीत नाहीत, उलट त्यांना या श्रद्धांचा आपल्या जीवनाला आधार आहे असे प्रामाणिकपणे वाटते, याचे पूर्ण भान राखून, आणि या लोकांविषयी आदर बाळगून व त्यांच्याशी आत्मीयतेने संवाद करण्याच्या नम्र भूमिकेमधून केला गेला पाहिजे. त्यांनाही त्या *अंनिस*प्रमाणेच अंध व घातक वाटल्या तर त्यांचा ही माणसे त्याग करतील, कारण त्यांनाही चांगुलपणाची, मांगल्याची ओढ आहे, हा विश्वास *अंनिस*ने बाळगावयास हवा.

श्री. खिलारे यांनी लोकांचे तीन वर्ग पाडले आहेत. त्यांमध्ये 'ज्यांच्या मनाला बदलायला अधिक कष्ट पडतात किंवा जो नवीन विचारांना आपल्या मनात सामावून घेत नाही' असा एक वर्ग त्यांनी पाडला आहे. ही माणसे कृति-कार्यक्रमांनी, संघर्षामुळे जास्त कडवट व कट्टर बनत असतीलही असे ते लिहितात, व याची त्यांना खंत वाटत नाही असे लक्षात येते. तरुण व कुमार वयातील व्यक्ती (*अंनिस*च्या लेखी असलेल्या) अंधश्रद्धांविरुद्धच्या संघर्षाने व संघर्षाद्वारा होत असलेल्या विचारप्रचाराने भारावून जातात, व त्यांच्यात बुद्धिवादी विचार-सरणी(rational thinking) व संशयवाद (skepticism) रुजतो असेही त्यांचे म्हणणे आहे. ते अशी आशा बाळगतात की, जास्त कडवट व कट्टर बनणारा जो वर्ग आहे तो उत्तरोत्तर नामशेष होईल.

या संदर्भात त्यांनी त्यांच्या मते *अंनिस* कोणत्या पूर्वकालीन चळवळींची, विचारपरंपरांची वारसदार आहे ते स्पष्ट केले आहे. अलीकडच्या काळातील सर्व जगावर प्रभाव टाकलेली व प्रभुत्वही गाजविणारी वैचारिक घडामोड 'एनलायटनमेंट' या नावाने सुपरिचित आहे. वर एके ठिकाणी म्हटल्याप्रमाणे, पाश्चिमात्य देशांतही अध्यात्म, धर्म, धार्मिक कर्मकांड, ईश्वरनिष्ठा, धर्मसंस्था

यांची कास धरावयाचे जनसामान्यांनी सोडल्याचे दिसून येत नाही. उलटपक्षी, वेगवेगळ्या कारणांनी जगभर 'मूलतत्त्ववादा'ची सरशी होत असल्याचे अनुभवास येत आहे. 'प्रतिगामी व धर्मांध शक्ती वाढत असताना' असे श्री. खिलारेंनीच म्हटले आहे. अशा परिस्थितीत *अंनिस*चे कार्य जास्त डोळसपणे, विवेकाने व जाणतेपणाने चालविले जाणे महत्त्वाचे ठरत नाही का?

महात्मा फुले टॉमस पेन यांच्या *राइट्स ऑफ मॅन* व *एज ऑफ रीझन* या ग्रंथांनी प्रभावित झाले होते, येथील ब्राह्मणी धर्मसंस्था, कर्मकांड व धर्मसिद्धान्त यांची चिकित्सा त्यांनी केली, त्यांना नवा माणूस घडवावयाचा होता व ते क्रांतदर्शी होते या सर्व गोष्टी खऱ्या. पण त्यांनी एका निर्मिकाचीही गोष्ट केली. त्यांचा निर्मिक हा 'व्यक्तिस्वरूप ईश्वर' (God in person) होता, आणि तो दयाळू, आस्थेवाईक व सर्वांची मोठी काळजी वाहणारा प्रेमळ पिताच जणू होता ही गोष्टही ध्यानात घेण्याची गरज आहे. चार्वाक परंपरेचे वा संशयवादी परंपरेचे फुले वारसदार नव्हते. त्यांची परंपराच सांगावयाची तर ती जीझस ख्राईस्टची व पैगंबर महंमदांची, अंशतः तरी संत तुकाराममहाराजांची होती. वारकरी चळवळीने लोकांचा चिकित्सक दृष्टिकोन मारला वा त्यांच्या अंधश्रद्धा वाढविल्या ही गोष्ट खरी नाही. 'तुका झालासे कळस' – ज्या वारकरी चळवळीने तुकोबांना कळसस्थानी बसविले ती चळवळ विद्रोही नव्हती, चिकित्सक नव्हती असे म्हणणे कितपत रास्त आहे याचा विचार श्री. खिलारे यांनी करावयास हवा.

*अंनिस*ने धर्माची चौकट ओलांडून पुढचे पाऊल टाकले आहे असे श्री. खिलारे यांनी म्हटले आहे. अंधश्रद्धा निर्मूलन समिती अंधश्रद्धांच्या निर्मूलनासाठी धर्माची चौकट मोडणे (म्हणजेच धर्म, अध्यात्म इत्यादींचा उच्छेद करणे) आवश्यक मानते असा याचा अर्थ होतो. हे उद्दिष्ट समोर ठेवणे समितीला योग्य वाटत असेल तर तिने अवश्य ती भूमिका घ्यावी. तो तिचा हक्क आहे. पण मग देवावर श्रद्धा ठेवून उपासना करण्याला समितीचा विरोध नाही हे कसे? की हा केवळ धोरणी पवित्रा आहे? याचा खुलासा व्हायला हवा. आमचे म्हणणे एवढेच की, धर्माची चौकट न मोडताही सर्व घातक (अंध)श्रद्धांचे उच्चाटन शक्य आहे.

सानेगुरुजी जन्माने ब्राह्मण होते. पण सगळ्या पारंपरिक समजुती व श्रद्धा बाळगणारे ब्राह्मणजातीय म्हणून ते जगले असे म्हणणे न्याय देणारे नाही. दुसरी गोष्ट अशी की, पंढरपुरचे विठ्ठलमंदिर खुले करण्यासाठी केलेला तुफानी दौरा असो, की १९२० नंतरची त्यांची पत्रकारिता, भाषणे, लेखन वा राजकीय कार्य असो, केवळ सवर्णांशी संवाद ते करीत होते असे नाही. तसेच, श्री. खिलारे अशा प्रकारे लिहितात की फक्त ब्राह्मण व तत्सम उच्चवर्णीय हेच सवर्णात मोडतात. शूद्रही सवर्णातच मोडतात. डॉ. आंबेडकरांनी सवर्णांशी संवाद साधण्याचा आटोकाट प्रयत्न केला पण त्यांच्या पदरात अधिक मानहानीच पडली, असे श्री. खिलारे लिहितात. शिक्षण पूर्ण होऊन सार्वजनिक जीवनात प्रवेश केल्यानंतरच्या त्यांच्या चरित्रात **पूर्वास्पृश्य या नात्याने** मानहानीची वागणूक मिळण्याचे जे प्रसंग नमूद आहेत त्यांची संख्या 'असंख्य' म्हणावी इतकी नाही. ती हाताच्या बोटावर मोजण्याइतकी फारतर निघेल. सवर्णांशी त्यांचा संवाद होऊ शकला नाही असेही आढळत नाही. बौद्ध धर्माची दीक्षा आपल्या लक्षावधी अनुयायांसह त्यांनी घेतली त्याच्या मुळाशी संवाद साधण्यातले अपयश वा व्यक्तिगत मानहानी नव्हती. हिंदुधर्मातील जातिव्यवस्था व स्पृश्यास्पृश्यता सवर्ण हिंदू कधीच निर्मूल करू शकणार नाहीत, कारण हिंदुधर्माची सारी इमारत त्या पायावर उभी आहे, हा त्यांचा निवाडा होता. हा निवाडा योग्य होता की नाही हा स्वतंत्र चर्चेचा विषय आहे.

धर्माची चौकट न मानण्याची भूमिका घेऊन *अंनिस*ने जे पाऊल पुढे टाकले आहे असे श्री. खिलारे लिहितात ते पाऊल खरोखरी पुढचे आहे का, आणि ते पुढचे पाऊल आहे असे मानण्यात *अंनिस* तिला न समजलेली आणि तिच्या कार्यासाठी आवश्यक व इष्ट नसलेली भूमिका घेऊ पाहत आहे का, असे दोन प्रश्न आम्ही उपस्थित करू इच्छितो.

श्री. खिलारे यांच्या लेखातील इतरही काही मुद्यांची दखल घ्यावी असे पुनर्वाचनानंतर वाटले. म्हणून ही पुस्ती :

(१) अधार्मिक क्षेत्रातील अंधश्रद्धाही दूर करण्याचा *अंनिस* प्रयत्न करते असे श्री. खिलारेंनी म्हटले आहे. या भूमिकेचे आम्ही स्वागतच करतो. पण यामधून काही प्रश्न समोर येतात.

अ) अपुऱ्या ज्ञानापोटीच्या समजुती, स्वार्थी हितसंबंधांपोटी बाळगली जाणारी मते व घेतल्या जाणाऱ्या आग्रही भूमिका, आणि श्रद्धा यांच्यात भेद करायला हवा असे आम्हाला दिसते.






व) श्रद्धा आणि धर्म, धार्मिकता यांचा अतूट असा अन्योन्यसंबंध *अंनिस* मानत नसेल तर, 'श्रद्धा' या शब्दाची व्याख्या *अंनिस* कशी करते?

(२) *अंनिस अनिष्ट साधनां*चा वापर करते असे आम्ही म्हटले नव्हते. धक्कातंत्र, संघर्ष यांचेही एक स्थान आम्ही मान्य केले होते. आम्ही 'पथ्यां'चा विचार मांडला होता. जी पथ्ये सांभाळावयास हवीत ती न सांभाळणे ही गोष्ट आम्हाला अनिष्ट वाटते.

(३) धर्माधिष्ठित नीति ही भीतीवर आधारलेली नीती असते हे म्हणणे सर्वस्वी खरे नाही. आणि बुद्धिप्रामाण्यवादी ('रॅशनलिस्ट') वा उपयुक्ततावादी ('युटिलिटेरियन') नीती हीदेखील अंशतः विपरीत परिणामांच्या भीतीपोटी अंगिकारलेली नीती असते असे म्हणायला जागा आहे. (उदा. शिक्षेला भिऊन लोक नीतीने वागतील या गृहीतकृत्याचा आधार अनेकानेक कायद्यांना असतो.)

(४) वैज्ञानिक संशोधनाद्वारे हाती येणारे 'सत्य' हे न-नैतिक असते. अशा सत्यांच्या आधारे नीती निर्धारित होऊ शकते का? उदा. अणुऊर्जा या वैज्ञानिक शोधामधून एक वैज्ञानिक 'सत्य' हाती येते. पण ते सत्य स्वतः होऊन कोणतेच नैतिक तत्त्व वा मूल्य कसे हाती येणार? वैज्ञानिक सत्याचे स्वरूप 'वस्तुनिष्ठता' हे असते, तर नैतिक सत्य 'नॉर्मेटिव' (वागणे कसे असावे हे योग्य, इष्ट होईल या अर्थाचे) असते. विज्ञान, वैज्ञानिक सत्य हे नीतीचे अधिष्ठान कसे होऊ शकते?

(५) "मानवाची आतापर्यंतवची प्रगती विज्ञानाने झालेली आहे", हे म्हणणे 'अधार्मिक श्रद्धे'चे उदाहरण मानायचे का? कारण ऐतिहासिक, वस्तुनिष्ठ हे नाही ही गोष्ट नक्की. आधुनिक अर्थाने विज्ञान तंत्रविज्ञानाच्या रूपाने प्रथम प्रकट झाले ते अठराव्या-एकोणिसाव्या शतकात. त्या आधी प्रगती झालीच नाही? आणि कला, तत्त्वज्ञान, साहित्य या क्षेत्रांतील उत्तमोत्तम निर्मिती यांचा प्रगतीशी काही संबंध आहे की नाही?

(६) प्रांजळ सश्रद्ध भाविक लोकांशी *अंनिस*चे कार्यकर्ते 'आत्मीय संवाद' साधीत असले तर ती फारच स्वागतार्ह गोष्ट म्हणायला हवी. 'आत्मीय संवाद' कशाला म्हणावे, त्याची वैशिष्ट्ये कोणती, यावरून मतभेद होतील अशी शक्यता दिसते. (*अंनिस*च्या मते अंध व घातक असलेल्या) श्रद्धा, त्यांवर आधारलेला व्यवहार, आणि तो व्यवहार करणारे श्रद्धावान लोक यांच्यात भेद करता येत नाही, अशा स्वरूपाचे वाक्य श्री. खिलारे लिहितात त्यामुळे, 'आत्मीय संवाद' हे शब्द आम्ही वेगळ्या अर्थाने वापरतो असे लक्षात आले.

***वसंत पळशीकर***











अनुक्रमणिका

# श्री. देवीदास बागूल आणि आम्ही

गेल्या काही दिवसांमध्ये आम्हाला अशी तीन पत्रे आली की ज्यांची दखल घेणे गरजेचे आहे. तिन्ही पत्रे श्री. देवीदास बागूल आणि श्री. अद्वयानंद गळतगे यांनी एकमेकांच्या *नवभारत*मधील लेखनाबद्दल केलेल्या टीकाटिप्पणीच्या संदर्भातील आहेत. मार्च १९९९ च्या अंकात श्री. गळतगे यांचे पत्र आम्ही छापले त्याच्या शेवटी संपादकीय टीप टाकली होती की, 'हा विषय येथे संपविण्यात येत आहे.' ही टीप प्रसिद्ध झाल्यावर वरील तिन्ही पत्रे यावीत हा सुखद योगायोग नसावा. (अशी टीप टाकल्यावर संपादकांना *नवभारत*मध्ये प्रसिद्ध होणाऱ्या लेखनाबद्दल पत्रे येणार असली तर आम्ही दर अंकात एकदोन जागी अशी टीप टाकावी म्हणतो.) येत्या काही दिवसांत आणखीही काही पत्रे येतील ही शक्यताही आम्ही स्वीकारली आहे.

अमुक एका विषयाची चर्चा उत्तमरीत्या चालली असता वा ऐन रंगात आली असताना ती चर्चा बंद का करीत आहात, अशी विचारणा करणारी ही पत्रे नाहीत.

*नवभारत*चे एक ज्येष्ठ लेखक डॉ. म.अ. मेहेंदळे आपल्या पत्रात (१५.४.९९) लिहितात :

"*नवभारत*च्या मार्च १९९९ च्या अंकात 'पत्रव्यवहार'या सदरात 'अध्यात्म विषयातील बागूल यांची समज' हा श्री. अद्वयानंद गळतगे यांचा श्री. बागूल यांचे आरोप खोडून काढणारा लेख प्रसिद्ध झाला आहे तो वाचला. ह्याआधीचे श्री. बागूल आणि श्री. गळतगे यांचे लेख मी वाचले नसल्यामुळे ह्या विषयाची पार्श्वभूमी मला माहीत नाही. आचार्य श्री. रजनीश यांचेही मी काही वाचले अथवा ऐकले नाही. अध्यात्म विषयात माझी गती अत्यल्प आहे. त्यामुळे श्री. गळतगे यांचे सर्वच म्हणणे मला नीट समजले आहे असे नाही. त्यांच्या लेखातील जेवढा भाग मला समजला तिथले त्यांचे म्हणणे योग्य आहे असे मला वाटते. मला न समजलेल्या भागातील त्यांचे म्हणणेही योग्य असू शकेल. तथापि श्री. गळतगे यांनी श्री. बागूल यांना उद्देशून जी भडक भाषा वापरली आहे ('अध्यात्म-शास्त्रातील संकल्पना त्यांच्या डोक्यावरून गेल्या आहेत!', 'बागूल अध्यात्म विषयात किती अडाणी आहेत' इत्यादि) ती लेख वाचताना खटकते. असे उल्लेख नसते तरी श्री. गळतगे यांचे म्हणणे वाचकांना पटले असते. श्री. बागूल यांनी त्यांच्या लेखात 'ठोकण्या'ची भाषा केली आहे असे श्री. गळतगे लिहितात. तसे केले असले तर ती भाषाही अनिष्ट आहे.

"लेखाच्या अखेरीस एक टीप देऊन संपादकांनी हा विषय संपविला असल्याचे जाहीर झाले आहे. अशा प्रकारचे वाद कुठेतरी संपवायला हवेत हे खरे. वाद करणाऱ्यांनीच आपापल्या पुरता वाद संपवीत असल्याचे जाहीर करणे हा उत्तम मार्ग आहे. श्री. गळतगे यांनी आपले म्हणणे वरील लेखात निर्णायक स्वरूपात मांडले आहे. त्याला उत्तर देण्यास काही वाव आहे किंवा नाही, आणि असल्यास श्री. बागुलांचा उत्तर देण्याचा विचार आहे की नाही काही कल्पना नाही. पण श्री. बागुलांनी काही खुलासा *नवभारत*कडे पाठविला तर तो आपण प्रसिद्ध करावा, अशी विनंती मी करतो."

मराठीचे ख्यातनाम प्राध्यापक व ज्येष्ठ समीक्षक, संत-वाङ्मय व अध्यात्म या विषयांचे जाणकार अभ्यासक प्रा. व.दि. कुलकर्णी आपल्या पत्रात (१७.४.९९) लिहितात :

"*नवभारत* मार्च १९९९ च्या अंकातील श्री. गळतगे यांचे लेखन वाचण्यात आले. यापूर्वीचे यासंबंधीचे लेखन वाचण्यात आलेले नाही. विज्ञान विषयाचे विद्यार्थी महाविद्यालयात प्रॅक्टिकल करतात म्हणजे काय, याविषयी तेथे विचार आलेले आहेत. मी बी.एससी. (Physics-Maths) चा अभ्यास केलेला आहे. विज्ञानाचा सैद्धांतिक अभ्यास वर्गातील व्याख्यानांतून होतो; त्यावरील पुस्तके वाचूनही तो होतो. 'बॉयलचा सिद्धान्त' त्यावरून अचूकपणे सांगता येतो; सुस्पष्ट रीतीने मांडता येतो. मग Practicals ची गरज काय? विज्ञान हे प्रयोगनिष्ठ शास्त्र आहे; तेव्हा प्रत्येक वैज्ञानिक तत्त्व हे प्रयोगाने अनुभवास आल्याशिवाय खरे मानायचे नाही, हा दंडक. विद्यार्थी प्रयोगशाळेत हे सिद्धान्त स्वतः प्रयोगरूपाने अनुभवतात;

मगच त्यांचे वैज्ञानिक ज्ञान खरे ठरते. तेव्हा विद्यार्थी जुने शोध नव्यानव्याने पुन्हा लावीत नसतात; ते तपासूनही पाहत नसतात. ते जुने सिद्धान्त प्रयोगरूपाने अनुभवून शिकत असतात. 'Practical is a learning process.' ग्रंथातून जे वाचले त्याची validity ते प्रत्यक्ष अनुभवतात. असे अनुभवप्रमाण जे ज्ञान ते विज्ञानपदवीस प्रमाण ठरते.

"प्रा. देवीदास बागूल हे मला यासंबंधात भेटायला आले होते. सारा 'वाद' त्यांनी थोडक्यात मला सांगितला. त्यांना श्री. गळतगे यांना अखेरचे प्रत्युत्तर देण्याची संपादकांनी संधी दिली नाही, याचे दुःख झाले आहे: आपण ही चर्चा (?) थांबवली आहे. हा संपादकांचा अधिकार आहे. मी बागूल यांना एवढेच सांगितले की, 'पूर्वपक्ष-उत्तरपक्ष', 'खंडन-मंडन,' 'खरे-खोटे' असा कसलाही पवित्रा न घेता, शब्दच्छल उभयपक्षीही न होता, जेवढी तत्त्वचर्चा होईल तेवढी 'तत्त्वबोधा'ला ती उपकारक ठरते. तेव्हा तुम्ही १०-१२ ओळींत तुम्हांस जे मूलभूत सांगायचे आहे ते सूत्ररूपात, विधायक पद्धतीने मांडावे. तो मूलाशय महत्त्वाचा. हा सूत्ररूप मूळ आशय आपण संपादकांकडे पाठवावा व त्यांना तो प्रकाशित करावा, अशी विनंती करावी. प्रा. बागूल यांना हे मान्य झाले आहे. ते असा मजकूर आपणांकडे पाठवतील. श्री. गळतगे यांच्या अंतिम उत्तराबरोबर प्रा. बागूल यांचेही अंतिम प्रत्युत्तर एकाच वेळी अंकात आले असते, तर प्रश्नच नव्हता. ते असो. प्रा. बागूल यांचे निवेदन आपण पाहावे व काय करणे शक्य आहे ते करावे, ही विनंती. या माझ्या लेखनाचा राग मानू नये, ही विनंती."

तिसरे पत्र बृहन्महाराष्ट्र कॉलेज ऑफ कॉमर्स, पुणे येथून निवृत्त झालेले प्रा. विलास जोशी यांचे आले. ते लिहितात :

"श्री. देवीदास बागूल व श्री. अद्वयानंद गळतगे यांच्यातील 'पत्रव्यवहारा' मध्ये श्री. गळतगे यांनी लिहिलेले *नवभारत* मधील पत्र मी वाचले. तथापि श्री. देवीदास बागूल यांचा मूळ लेख वाचल्यावर मला असे दिसले की, श्री. गळतगे यांचे मूळ विधान श्री. बागूल यांनी अवतरण चिन्हांत उद्धृत केले आहे.

"त्या उद्धृत केलेल्या अवतरणातील विधानावरून असे स्पष्ट होते की, शाळा-कॉलेजांमधील सर्व प्रयोगशाळांमधून विज्ञानातील शोध लावले जातात, असे श्री. गळतगे यांना म्हणावयाचे आहे."

श्री. देवीदास बागूल हे या संदर्भात भेटल्याचे प्रा. व.दि. कुलकर्णी यांनी सरळच म्हटले आहे. आमचा कयास असा आहे की, श्री. बागूल डॉ. मेहेंदळे व प्रा. विलास जोशी यांनाही भेटले, त्यांच्याशी त्यांनी बोलणे केले, आणि त्यानंतर या उभयतांनी आम्हाला वरील पत्रे पाठवली. (प्रा. कुलकर्णी यांच्या पत्रात इतरही काही मजकूर कामाचा आहे.)

श्री. बागूल आणखीही कोणाकोणास भेटले असावेत असे दिसते.

ऑक्टोबर १९९८ च्या अंकात श्री. गळतगे यांचा लेख 'विज्ञान, धर्म, तत्त्वज्ञान, रजनीश आणि बागूल' प्रसिद्ध झाला. त्यावर प्रत्युत्तरादाखल लिहिलेला श्री. बागूल यांचे लेखन नोव्हेंबर-डिसेंबर १९९८ च्या अंकात प्रसिद्ध झाले. त्याच अंकात, श्री. गळतगे यांचे 'चुकीची दुरुस्ती व क्षमाप्रार्थना' हे पत्र, आणि श्री. बागूल यांनी त्यांच्या प्रत्युत्तरात श्री. वसंत पळशीकर यांच्याबद्दलही काही शेरे मारले असल्याने, आम्ही व्यक्तिशः केलेला 'खुलासा'ही प्रसिद्ध केला. श्री. बागूल यांच्यावर अन्याय करणारे विधान केल्याबद्दल, त्या विधानाची दुरुस्ती व चुकीबद्दल क्षमाप्रार्थना श्री. गळतगे यांनी स्वतःहोऊन पत्र पाठवून केली होती. आमच्या आठवणीप्रमाणे त्यांनी श्री. बागूल यांनाही पत्र पाठवले होते.

स्वतःवर घोर अन्याय होत आहे ही श्री. बागूल यांची समज झाल्यावर त्यांनी अन्यायाचा निषेध व त्याचे परिमार्जन व्हावे या हेतूने अनेकांच्या भेटी घ्याव्यात आणि त्यांना संपादक, *नवभारत* या नावे पत्रे पाठविण्यास सुचवावे वा विनंती करावी याबद्दल आमची अजिबात तक्रार नाही.

पण आम्हाला असे नक्कीच म्हणावयाचे आहे की, 'हा विषय येथे संपविण्यात येत आहे' या संपादकीय निर्णयाने ते वरील निष्कर्षावर आले आहेत तर, त्यांनी श्री. गळतगे यांचा मूळ लेख, स्वतः त्यांचे (श्री. बागूल यांचे) प्रत्युत्तर, त्याच अंकात प्रसिद्ध केलेली, 'चुकीची दुरुस्ती व क्षमाप्रार्थना' व 'अधिकचा खुलासा' हा साराच मजकूर श्री. गळतगे यांच्या मार्च १९९९ मधील उत्तरासोबत दरेकास वाचावयास द्यावयास हवा होता. ही त्यांची जबाबदारी होती. वरील तिन्ही व्यक्तींच्या पत्रांवरून हे स्पष्ट होते की, त्यांनी आधीचे पूर्ण लेखन वाचलेले नाही.

अनुक्रमणिका

वरील तिन्ही पत्रलेखक आमच्या लेखी आदरणीय व्यक्ती आहेत. त्यांचा आमचा योगायोगाने व्यक्तिगत परिचयही आहे. सर्व 'वाद' विचारात घेऊन त्यांनी आमच्या निर्णयातले उणेपण आम्हाला दाखवून दिले असते, त्याची कारणे आम्हांला स्पष्ट करून पटवून दिली असती तर आमच्या उद्‌बोधनासाठी आम्ही त्यांचे ऋणीच राहिलो असतो. यानंतरही, त्यांनी सर्व 'वाद' वाचून जर आम्हाला त्यांचा अभिप्राय सविस्तर कळवला तर आम्ही त्याचा यथोचित आदरच करू. त्यांनी एवढी तसदी घ्यावी अशी विनंती करून त्यांचा बहुमोल वेळ घ्यावा एवढी ही बाब आम्हाला अर्थपूर्ण वाटत नाही, हे वेगळे.

त्यांच्या पत्रांमधील मजकूर प्रसिद्ध करून आम्ही *नवभारत*च्या वाचकांना व पत्रलेखकांना न्याय दिला आहे, आणि तेवढे पुरेसे आहे.

श्री. बागूल हेदेखील *नवभारत*चे एक आदरणीय लेखक व व्यक्तिशः आमचे मित्र आहेत. त्यांचेही संपादक, *नवभारत* या नावे पत्र आले आहेच. मूळ लेखकाला शेवटचा उत्तराचा अधिकार असतो, आणि या संदर्भात तो त्यांचा अधिकार आम्ही त्यांना नाकारून त्यांच्यावर अन्याय करीत आहोत व तत्त्वच्युतीही करीत आहोत असे त्यांचे म्हणणे आहे. याच पत्रात तत्त्व, रास्त रीत आम्हाला परिचित आहे, व ती आम्ही कटाक्षाने पाळत आलो, असे श्री. बागूल यांनी म्हटले आहे.

आमच्या समजुतीनुसार, मुळात चर्चा/वाद हा प्रा. श्रीनिवास दीक्षित यांच्या डॉ. आ.ह. साळुंखे यांच्या चार्वाकदर्शना-वरील एका पुस्तकाच्या परीक्षणावरून सुरू झाला. यात डॉ. आ.ह. साळुंखे यांनी भाग घेतला. त्यांचे प्रत्युत्तर *नवभारत*चा एक मोठा विशेष अंक म्हणून प्रसिद्ध झाले. यानंतर एका टप्प्यावर प्रा. कृ.श्री. अर्जुनवाडकर यांनी चार्वाकांच्या तत्त्वज्ञानावर काहीसा स्वतंत्र म्हणावा असा, पण प्रा. दीक्षित–डॉ. साळुंखे यांच्यातील वादाची दखल घेत, लेख लिहिला. श्री. बागूल यांनी प्रा. दीक्षित व प्रा. अर्जुनवाडकर यांच्या युक्तिवादांचा परामर्श घेणारा लेख लिहून या वादात/चर्चेत सहभाग दिला. श्री. बागूल यांच्या प्रतिपादनाचा परामर्श श्री. गळतगे यांनी घेतला. तेव्हा, आमच्या मते, मूळ लेखक म्हणावयाचेच तर प्रा. दीक्षित व प्रा. अर्जुनवाडकर होत. श्री. बागूल व श्री. गळतगे दोघेही वाद/चर्चा यात सहभागी झाले.

आता, श्री. बागूल यांचे नोव्हेंबर-डिसेंबर १९९८ च्या अंकातील लेखन हे 'श्री. गळतगे यांची टीकापद्धती' यासंबंधी आहे. चार्वाकांचे तत्त्वज्ञान या विषयावरील चर्चा, वा विज्ञान, धर्म, तत्त्वज्ञान या विषयांवरील चर्चा पुढे नेणे हा उद्देश नाही. त्यांचे हे प्रत्युत्तर मुख्य विषयाशी संबंधित नसून एका व्यक्तीवर त्याचा पूर्ण रोख आहे, त्यात *नवभारत*च्या संपादकांवरही (निष्कारण) हेत्वारोप आहेत, या कारणाने ते न छापावे हे योग्य ठरले असते. पण, आपली मुस्कटदाबी संपादकांनी चालविली आहे, श्री. गळतगे यांना पाठीशी घातले जात आहे, असा श्री. बागूलांनी पक्का ग्रह करून घेतला असता. त्यांची मुस्कटदाबी करण्याची भूमिका नव्हतीच. म्हणूनच केवळ त्यांचे प्रत्युत्तर जसे त्यांनी लिहिले तसे छापले. त्यांच्या प्रत्युत्तराचा रोख व आशय लक्षात घेता, श्री. गळतगे यांच्या लेखाला या संदर्भात 'मूळ लेखा'चा दर्जा स्वतः श्री. बागूल यांनीच दिला आहे. आपण सत्यापलाप केला नसून श्री. गळतगे हेच कसे 'खोटे' आहेत, हे दाखवून देण्यावर श्री. बागूल यांचा सारा भर आहे. आपल्या लेखनात सत्यापलाप झालेला नाही, श्री. गळतगे यांचे प्रतिपादन कसे अयोग्य, चुकीचे आहे हे नीटपणे दाखवून विषयाची चर्चा अधिक खोलात श्री. बागूल करू शकले असते. पण त्यांनी तसे केले नाही.

या व्यक्तिगत टीकेला उत्तर देण्याचा हक्क श्री. गळतगे यांना यामुळे मिळतो. श्री. गळतगे यांचे जे उत्तर आले त्यात त्यांनी केवळ श्री. बागूल यांच्यावर वैयक्तिक टीका करण्याचीच गोष्ट केली असती तर त्यांचा 'हक्क' असूनही त्यांचे उत्तर आम्ही छापलेच असते असे नाही. पण आमचे मत असे झाले की, त्यांनी श्री. बागूल यांची काही विषयांची समज कशी चुकीची आहे हे तात्त्विक युक्तिवादांनी साधार मांडण्याची भूमिका घेतली आहे. त्यांच्यावरील 'खोटारडेपणा'चा आरोप परतवून लावीत असता त्यांची भाषा व विधाने तिखट व बोचरी झाली आहेत, हे डॉ. मेहेंदळे यांचे मत आम्हाला मान्य आहे. पण श्री. बागूल यांच्या प्रत्युत्तराची भाषा व रोख ध्यानात घेता ही गोष्ट सर्वस्वी टाळणे कठीण होते. संपादकीय अधिकाराचा वापर करून आम्ही हा भाग अगदीच काढून टाकणे हे श्री. गळतगे यांना अन्याय करणारे ठरले असते. तरी आम्ही आमचा अधिकार वापरून पुष्कळ संक्षेप केला, व याचा श्री. गळतगे यांनी मोकळ्या मनाने स्वीकार केला याचाही कृतज्ञतापूर्वक उल्लेख करणे योग्य होईल. श्री. बागूल यांच्या प्रत्युत्तराचा असा संक्षेप आम्ही केला नव्हता.

श्री. बागूल यांच्या पत्रात, त्यांची अध्यात्म विषयाची

समज श्री. गळतगे म्हणतात तशी 'अडाणी' पणाची तर नाहीच, पण अधिक सरस आहे, हे साधार तात्त्विक युक्तिवादाद्वारे त्यांनी दाखवून दिले असते, किंवा प्रा. व.दि. कुलकर्णी यांचा सल्ला मानून त्यांनी, श्री. गळतगे कसे 'खोटे'च आहेत हे दाखविण्याचा प्रयत्न न करता, अध्यात्माची स्वतःची मांडणी सूत्ररूपाने केली असती तर आम्ही त्यास प्रसिद्धी दिलीही असती. शेवटचे उत्तर देण्याचा अधिकार म्हणून मात्र नव्हे. श्री. गळतगे व श्री. वागूल यांची एकमेकांवरील व्यक्तिगत टीकाटिप्पणी हा विषय संपविण्यात आलेलाच आहे. पण, दुर्दैवाने, श्री. वागूल यांचे पत्र श्री. गळतगे यांचा 'खोटे'पणा 'सिद्ध' करण्याचाच एकमेव मुद्दा करीत असल्याने – जो ते सिद्धही करू शकलेले नाहीत, ही गोष्ट वेगळी – ते प्रसिद्ध करण्याचा प्रश्न उद्‌भवत नाही.

श्री. गळतगे यांचे उत्तर आम्ही छापले याचा अर्थ, श्री. वागूल यांना 'अध्यात्म' हा विषय कळत नाही असा आमचाही अभिप्राय आहे, अशा कोणीच घेऊ नये. मुद्दा तो नाही. श्री. वागूल समजतात तसा, श्री. वागूल यांना 'ठोकणे' यात आम्हाला रस अजिवात नाही. पण या विशिष्ट वादंगात, वर स्पष्ट केल्याप्रमाणे, शेवटचे म्हणणे मांडण्याचा अधिकार श्री. गळतगेंचा होता, व श्री. वागूल यांनी त्यांना टीकेचे लक्ष्य बनविल्यामुळे तो त्यांना प्राप्त झाला.

प्रस्तुत संपादकीय खुलासा श्री. वागूल यांच्यासाठी जितका आहे त्याहीपेक्षा अधिक तो *नवभारत*च्या संपादकांना श्री. वागूल यांच्या वतीने आवाहन करणाऱ्या पत्रलेखकांसाठी व *नवभारत*च्या वाचकांसाठी आहे.

"श्री. गळतगे यांचे मूळ विधान श्री. वागूल यांनी अवतरण चिन्हांत उद्धृत केले आहे." आणि "(त्या) विधानावरून असे स्पष्ट होते की, शाळा-कॉलेजांमधील सर्व प्रयोगशाळांमधून विज्ञानातील शोध लावले जातात, असे श्री. गळतगे यांना म्हणावयाचे आहे", असे त्यांच्या पत्रात प्रा. वि.अ. जोशी यांनी म्हटले आहे.

ऑक्टोबर १९९८ चा अंक काढून पाहता, वादातील मुद्याच्या दृष्टीने श्री. गळतगे यांचे पुढील विधानदेखील श्री. वागूल यांनी उद्धृत करणे आवश्यक होते. ते विधान असे : "या प्रयोगशाळांमधून पूर्वी शास्त्रज्ञांनी लावलेले शोधच विज्ञानाचे विद्यार्थी पुनःपुन्हा लावत असतात हे रजनीश विसरतात." श्री. गळतगे पुढे असे म्हणतात की, "... त्या शोधाच्या प्रत्यक्ष अनुभवातून प्रत्येक विद्यार्थ्याला जावे लागते, आणि त्याच्या दृष्टीने तो नवाच शोध असतो." श्री. वागूल यांनी श्री. गळतगे यांचे संपूर्ण म्हणणे समजून न घेता, टीकाटिप्पणी करीत, विधान खोटे असल्याचा व सत्यापलाप केल्याचा आरोप केला आहे. शाळा-कॉलेजांच्या प्रयोगशाळांतल्या प्रॅक्टिकल्सचे स्वरूप व प्रयोजन काय असते, व "शास्त्रज्ञांनी लावलेले शोधच विज्ञानाचे विद्यार्थी पुनःपुन्हा लावत असतात" की काही वेगळे घडत असते याची चर्चा होऊ शकेल. पण शाळा-कॉलेजांच्या प्रयोगशाळांमध्ये नवनवे शोध विज्ञानाचे विद्यार्थी लावतात असे विधान श्री. गळतगे यांनी केलेले नाही. त्यांची खुलाशाची वाक्ये ही गोष्ट स्पष्ट करतात. श्री. गळगते यांचा आक्षेप बरोबर आहे हे प्रा. विलास जोशी यांच्या लक्षात येईल.

आता, प्रॅक्टिकल्सचे स्वरूप व प्रयोजन यांचे वर्णन कसे करणे योग्य होईल? प्रा. व.दि. कुलकर्णी यांनी त्याची काही मांडणी केली आहे. प्रॅक्टिकल्सचे स्वरूप, विद्यार्थी आधी लावलेल्या शोधाचा स्वतःसाठी परत 'नव्या'ने शोध लावतो असे नसते असे अनुभवाने आमचे मत आहे. वैज्ञानिक प्रयोगाची रीत, शिस्त व पथ्ये यांचा परिचय करून द्यावा, अनेक प्रयोग करीत ती रीत, शिस्त व पथ्ये विद्यार्थ्यांनी आत्मसात करावीत, हे प्रॅक्टिकल्सचे उद्दिष्ट असावे असे दिसते. पण हे उद्दिष्ट साध्य करण्यासाठी गांभीर्याने, कल्पकतेने व काटेकोर आग्रह राखून प्रॅक्टिकल्सची आखणी करणे गरजेचे आहे. तसे केले जात नसते. प्रा. व.दि. कुलकर्णींचे विवेचन सापेक्षतः जास्त अनुरूप आहे. पण तेही सापेक्षतःच. म्हणजे, हा विषय आणखी नीट चर्चा करण्याचा आहे. कोणीही 'सत्यापलाप' केला आहे असे म्हणण्याचे कारण नाही.

आचार्य रजनीश यांचे एक म्हणणे खोडून काढीत असताना श्री. गळतगे यांनी शाळा-कॉलेजांमधील प्रयोगशाळांतल्या प्रॅक्टिकल्सचा आधार घेतला आहे. विज्ञानाविषयीचे रजनीशांचे विधान (विज्ञान तो बासा हो जाता है।) बरोबर नाही; पण ते चूक कसे आहे हे दाखवून देण्यासाठी जे उदाहरण श्री. गळतगे ह्यांनी उपयोगात आणले आहे ते उदाहरण चपखल नाही असे म्हणता येईल. असो.

***वसंत पळशीकर***








**आगामी प्रकाशन**

वैदिक संस्कृत, भाषाशास्त्र, महाभारत-रामायण-भगवद्गीता, संस्कृत वाङ्मय यांचे
गाढे अभ्यासक व रसिक समीक्षक

**प्राच्यविद्यापंडित डॉ. म.अ. मेहेंदळेकृत**

# प्राचीन भारत : समाज आणि संस्कृती

**निवडक मौलिक लेखांचा संग्रह**

**विभाग : वैदिक संस्कृती**

तत्को वृत्रः
मित्र (वेद) आणि मिथ्र (अवेस्ता)
श्रद्धा
असि-असित आणि भारतातील लोहयुग
सती : काही प्राचीन संदर्भ
*वैदिक संस्कृतीचा विकास* (समीक्षा)
*उपनिषदांचा अभ्यास* (समीक्षा)
प्राप्य वरान् निबोधत

**विभाग : महाभारत**

भारतीय युद्ध – एक पूर्वनियोजित घटना?
भारतीय युद्ध – एक धर्मयुद्ध?
कौरवांचे 'योगेश्वर' कोण?
यत्र योगेश्वरः कृष्णः
मित्रद्रोहे च पातकम्
मुक्तकेशी द्रौपदी
द्रौपदी वस्त्रहरण
नियतीचा दंड
*महाभारताचा उपसंहार* (समीक्षा)

**विभाग : भगवद्गीता**

*गीताई* (समीक्षा)
*गीताप्रवचने* (समीक्षा)
*गीताचिकित्सा* (समीक्षा)

**विभाग : रामायण**

भारतीय युद्ध आणि रामरावण युद्ध
– एक तुलनात्मक विवेचन
रामायण : समज आणि गैरसमज

**प्रा. मे.पुं. रेगे यांच्या विवेचक प्रस्तावनेसह**

डेमी आकाराची सुमारे ५५० पृष्ठे, पुठ्ठा बांधणी
प्रकाशनकाल : नोव्हेंबर १९९९
प्रसिद्धीपूर्व सवलतीची किंमत : रु. ४००/-
(नोंदणी : ऑक्टोबर १९९९ अखेर)

*संपर्कासाठी पत्ता* : **चिटणीस, प्राज्ञपाठशाळामंडळ, ३१५ गंगापुरी, वाई ४१२ ८०३ (जि. सातारा)**



अनुक्रमणिका

# अहिंसाधिष्ठित समाजव्यवस्थेच्या दिशेने

अम्लान दत्त

गांधींना जाऊन पन्नास वर्षे झाली. याच वर्षी मार्क्स-एंगल्स यांनी लिहिलेल्या कम्युनिस्ट मॅनिफेस्टोला दीडशे वर्षे पुरी झाली. तेव्हा, मार्क्सच्या विचाराच्या पार्श्वभूमीवर गांधीविचाराच्या काही पैलूंवर पुन्हा एकवार ध्यान देणे समयोचित होईल.

मुख्य प्रवाहातील पाश्चात्त्य अर्थशास्त्रज्ञांच्या मनात, मार्क्स हा आपला सर्वात प्रबळ प्रतिवादी आहे ही गोष्ट सदैव घर करून असे. असे असले तरी, एकतर त्याचा नामोल्लेखही करावयाचा नाही, किंवा त्याचे नाव घेतलेच तर त्याला तुच्छभाव प्रकट करीत बाद ठरवायची ही शिष्टमान्य रीत होती. भारतातील मुख्य प्रवाहातील विद्वान (ॲकॅडेमिक) अर्थशास्त्रज्ञांच्या दृष्टीने त्यांचा मुख्य प्रतिवादी गांधी राहिलेले आहेत. काहीजण गांधींच्या अर्थशास्त्रावर कठोर प्रहार करीत त्यांचा अव्हेर करतात. पण, सामान्यतः, ते त्यांच्याविषयी औपचारिक आदर व्यक्त करीत गांधींचा आर्थिक विचार कालबाह्य ठरवून मोकळे होतात. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर औद्योगिक विकासविषयक नेहरूंची आणि गांधींची, या दोन भूमिका पर्याय म्हणून समोर आल्या. सुशिक्षित वर्ग बहुतकरून नेहरूंची पुष्टी करणारा होता. पाश्चात्त्य समाजवादाच्या सौम्य प्रारूपाचा पुरस्कार नेहरू करीत. या प्रारूपावर मार्क्सचा, नाही म्हटले तरी, पुष्कळ प्रभाव होता. आचार्य विनोबा भावे हे गांधींचे एक मुख्य अनुयायी, आणि गांधींच्या प्रभावळीतील सर्वाधिक मूलग्राही तत्त्वचिंतक. त्यांनी असे लिहिले की, भविष्यात मार्क्सला अनुसरायचे की गांधींना हा पर्याय आहे, तेव्हा त्यांच्या म्हणण्यात तथ्य होते. मार्क्स व गांधी या दोन टोकांमध्ये, अर्थातच, 'मधल्या' पुष्कळ भूमिका घेता येण्यासारख्या आहेत, आणि त्यांच्याकडे दुर्लक्ष होता कामा नये. गांधी व मार्क्स यांच्या विचारव्यूहांमधील काही महत्त्वाच्या भेदांकडे ध्यान द्यायला हवे.

मार्क्सला अनुसरणाऱ्यांमध्येही मवाळ ते जहाल असे अनेक प्रवाह आहेत. राज्यसंस्था हे शोषणाचे साधन असते; भांडवलशाही व्यवस्थेत कामगारवर्गाचे शोषण करण्यासाठी आणि स्वतःचे हितसंबंध जोपासण्यासाठी भांडवलदारवर्गाच्या हाती असलेले ते साधन असते, ही मार्क्सची मांडणी होती. हे साधन स्वतःच्या कब्जात घेणे हे कामगारवर्गाचे क्रांतिकारक कार्य होते. मवाळ मार्क्सवाद्यांचे म्हणणे असे की, लोकशाही मार्गांनी आपण कब्जा प्राप्त करू शकतो. जहालांचे म्हणणे की, एका क्रांतिकारी पक्षात सुसंघटित होऊन हिंसक कृतीद्वारा जबरदस्तीने राज्यसंस्था ताब्यात घेणे हे कामगारवर्गाचे इतिहास-दत्त कार्य आहे. राज्यक्रांतिद्वारा सत्ता हस्तगत केल्यावर, प्रति-क्रांतिद्वारा सत्तेवर भांडवलदारवर्गाला कब्जा प्राप्त करणे अशक्य करण्यासाठी, क्रांत्युत्तर 'कामगारवर्गाची हुकूमशाही' ('डिक्टेटरशिप ऑफ द प्रॉलेटारियट') प्रस्थापित करणे आवश्यक असेल अशी मांडणी होती.

युरोपातील सोशल डेमोक्रॅट्स (मवाळ लोकशाही समाज-वादी)च्या दृष्टीने एक विकल्प उपलब्ध होता. केंद्रीभूत नियंत्रणा-खालील नियोजनबद्ध समाजवादी अर्थव्यवस्थेच्या तुलनेत संपत्ती ('वेल्थ')च्या निर्मितीच्या दृष्टीने भांडवलशाही ही अधिक कार्यक्षम व्यवस्था आहे अशी त्यांच्यापैकी अनेकांची धारणा बनली. तेव्हा बाजारपेठेवर आधारित व्यवस्था चालू राहू द्यावी असे त्यांचे म्हणणे. बाजारपेठी व्यवस्थेचे कामकाज सुधारण्याच्या, तिचे नियंत्रण करण्याच्या आणि तिला योग्य तिथे बळकटी आणण्याच्या दृष्टीने राज्यसत्तेने आपल्या हाती सत्ता राखली पाहिजे ही गोष्ट तर झालीच; पण, उत्पादनाच्या या व्यवस्थेद्वारा जी संपत्ती निर्माण होईल तिच्यातला मोठा हिस्सा काढून घेऊन त्याचा विनियोग पर्याप्त प्रमाणात लोकांना 'सामाजिक सुरक्षितता' (सोशल सिक्युरिटी)* प्राप्त करून देण्यासाठी करणे हे आपले कर्तव्य आहे व तो हक्कही आहे ही भूमिकाही

---

* 'सोशल सिक्युरिटी' ही, वस्तुतः, सर्वांना एक किमान जीवनमान उपलब्ध करून देण्यासाठी, मूलभूत सार्वजनिक सेवा व सुविधा प्राप्त करून देण्यासाठी उभी केलेली पूरक आर्थिक रचना होय. बेकार, अपंग, वृद्ध, बालके अशा विभिन्न गटांमधील व्यक्तींना, उत्पन्नाचे साधन त्यांच्यापाशी नसले तरी वा ते पुरे पडणारे नसले तरी, प्रतिष्ठेने जगता यावे यासाठी ही रचना करण्याची कल्पना. म्हणून 'सोशल सिक्युरिटी' हा शब्दप्रयोग रूढ झाला.










राबवावी, अशी त्यांची भूमिका होती. यां प्रकारे बाजारपेठी व्यवस्थेचा संयोग लोकशाही व विषमता दूर करणारा सामाजिक न्याय यांच्याबरोबर साधता येईल ही सोशल डेमोक्रॅट्सची आशा होती, व आहे. 'कामगारवर्गाच्या हुकूमशाही'चा ते विरोध करतात. कल्याणकारी राज्य ('वेल्फेअर स्टेट') व संसदीय लोकशाही यांचा आग्रह ते राखतात. या भूमिकेतही राज्यसंस्थेची भूमिका निर्णायक महत्त्वाची राहतेच ही गोष्ट लक्षात घेण्यासारखी आहे. समाजातल्या गोरगरीब व गरजू व्यक्तींचे 'कल्याण' करण्याचे काम राज्यसंस्था आपल्या हाती घेते. सोशल डेमोक्रॅट्स असोत की मार्क्सवादी, जहाल असोत वा मवाळ, राज्यसंस्थेवर ताबा मिळविणे ही गोष्ट राजकीय रणनीतीचा एक महत्त्वाचा भाग म्हणून दोघांनाही समान आहे.

वास्तवाचे गांधींचे दर्शन वेगळे होते. दक्षिण आफ्रिकेतील लढ्याच्या ओघात त्यांचा विचार परिपक्व झाला. तेथे अल्पसंख्य गौरवर्णीय समूहाच्या हाती राज्यसंस्थेची दमनकारी सत्ता एकवटलेली होती. या सत्तेविरुद्ध गांधी लढत होते. गांधी आणि मार्क्स यांच्यामध्ये मूलभूत महत्त्वाचे भेद होते.

वर्गसंघर्षाची चौकट स्वीकारली की मग प्रतिपक्ष असलेल्या शोषकवर्गाचा वा शत्रूवर्गाचा निःपात करण्याची भाषा करता येते. विचाराला हे वळण सहजी प्राप्त होते. लढा दोन वांशिक समूहांमध्ये असतो तेथे एका वांशिक समूहाचे पूर्ण निर्मूलन करण्याचा विचार बाळगणे वा ती भाषा वापरणे, या मार्गाने कलह मिटविण्याची गोष्ट करणे ही गोष्ट केवळ वास्तवाचे भान हरपलेला विकृतमनस्कच करू शकतो. भांडवलशाहीच्या विकासाच्या वाटचालीचे मार्क्सवादाने रेखाटलेले चित्र असे होते की, उत्पादक शक्तींच्या ('फोर्सेस ऑफ प्रॉडक्शन') उत्क्रांतीच्या ओघात समाजाचे 'ध्रुवीकरण' घडून येईल. औद्योगिक कामगारांचा एक वर्ग तीमधून आकाराला येईल, आणि तो संख्येने मोठा बहुसंख्य असेल. जेथे विभिन्न वांशिक समूह एकत्र येऊन समाज बनलेला असतो, आणि भविष्यातही या विभिन्न समूहांना एकमेकांसोबत राहावयाचे असते, तेथे परिस्थिती-परिवर्तनाची मदार सदसद्विवेकावर राहते. दक्षिण आफ्रिकेतली परिस्थितीही अशी होती की, तेथील हिंदी लोकसमूह राज्यसंस्था काबीज करू शकेल ही कल्पनाही करणे शक्य व व्यवहार्य नव्हते.

उघडच आहे की, गांधींच्या पुढे उपस्थित असलेले आव्हान मार्क्सपुढील आव्हानापेक्षा मूलतः वेगळे होते. पण तो केवळ एक छोटासा स्थानिक मामला नव्हता. त्या लढ्यात जे मुद्दे गुंतलेले होते त्यांना एक व्यापक परिमाण होते; समस्या या अर्थाने जागतिक होती. वंश/वर्णसंकर कितीही अधिक प्रमाणात झाला तरी, जग हे वांशिक व सांस्कृतिकदृष्ट्या पृथगात्म समूहांमध्ये आज विभागलेले आहे व भविष्यातही राहणार. जगाच्या पाठीवरचा कोणताही प्रदेश घेतला तर, वेळोवेळी यांपैकी एक समूह वरचढ तर दुसरे कनिष्ठ स्थानी आहेत असे चित्र आढळणार. अशा विभिन्न पृथगात्म समूहांनी परस्परांची आदर-प्रतिष्ठा राखत शांततेने एकमेकांसोबत राहणे शक्य व्हायचे असेल तर कोणती तत्त्वे व मूल्ये जोपासली व खोलवर रुजविली पाहिजेत, याचा शोध घेणे ही मूलभूत जबाबदारी आहे. दक्षिण आफ्रिकेत त्या काळी अल्पसंख्य गौरवर्णीयांनी सत्तेवर आपली पकड जमविली होती, पण समस्येच्या गाभ्याशी असलेला मुद्दा अल्पसंख्य गौरवर्णीयांच्या सत्तेला कसे उखडावयाचे हा नव्हता. एखादा समूह अल्पसंख्यच राहणार असेल आणि ज्या बृहत्तर समाजाचा तो एक घटक आहे त्या समाजात त्याचे स्थान अल्पसंख्य व सत्तेच्या संदर्भात कनिष्ठ/गौण हेच राहणार असेल तर? तरीदेखील, त्या समूहाला इतर बहुसंख्य, वरचढ समूहांच्या बरोबर शोषणमुक्त, दमनमुक्त स्थितीत आत्मसन्मानपूर्वक जगता यावे हा त्या समूहाचा मूलभूत हक्क आहे. भौतिक परिस्थिती व राजकीय शक्ती या दोन्ही दृष्टींनी दुर्बल असलेल्या समूहाने आपल्या मानवी हक्क, प्रतिष्ठा व सन्मान यांच्यासाठी लढा कसा द्यावा? गांधींसमोर हा प्रश्न होता. शोषक-शोषित, अन्याय करणारा व अन्याय सोसणारा, पीडक-पीडित यांच्यात एक 'अलिखित' असे सहकार्य असते म्हणूनच शोषण, दमन, अन्याय या गोष्टी शक्य होतात या निष्कर्षाप्रत गांधी आले. जर शोषित, पीडित समूहाने सहकार्य करावयाचे नाकारले तर दमन, शोषण चालू ठेवणे शक्य उरत नाही.

गांधीप्रणीत असहकार हा सत्याग्रहाचा एक प्रकार आहे. 'स्वतःला उमगलेल्या सत्यानुसार दृढ आचरण करणे' असा सत्याग्रहाचा अर्थ आहे. सत्याग्रही माणसाची वृत्ती व आचरण अहिंसक हवे. याचे कारण असे की, द्वेष वा क्रोध यांनी दृष्टी गढूळ बनते आणि अशा गढूळ दृष्टीला सत्याचे दर्शन घडू शकत नाही. तेव्हा 'शत्रू'शी लढा देत असताना, त्याच वेळी, स्वतःच्या शुद्धीकरणाचाही लढा स्वतःच्या आतमध्ये चालत राहिला पाहिजे.





द्वेषाच्या वेढ्यात आपण जितके सापडू, तितकी गैर उद्दिष्टांसाठी लढा देण्याची भूल आपण करू हा धोका वाढतो.

आपल्या प्रतिपक्षाच्या विवेकाला, सदसद्विवेकाला आणि माणुसकीला आवाहन करण्यात अहिंसक लढ्यामध्ये कधी खंड पडत नाही. परस्परांशी शत्रुत्व असणाऱ्या दोन वर्गांमध्ये समाज विभागलेला असतो अशी मार्क्सची पक्की धारणा होती. हितसंबंधाच्या पातळीवर भेद व विरोध असला तरी अंतःकरणाचा प्रतिसाद आणि भवितव्य या पातळ्यांवर मानव तितुका एकच असतो ही गांधींची आंतरिक निष्ठा होती. मार्क्सच्या मते मानवजातीचा इतिहास हा वर्गसंघर्षांचा इतिहास आहे. हिंसा-अहिंसा या दोन प्रवृत्ती व शक्ती यांच्यामधील संघर्षाची कहाणी म्हणजे मानवजातीचा आजवरचा इतिहास हे गांधींचे दर्शन. आदर्श स्वरूपातला सत्याग्रह माणसातल्या कमजोरीमुळे नेहमीच एक स्वप्न राहील हे शक्य आहे. पण निर्भयपणे व जिद्दीने त्या दिशेने पुढे जात राहणे हीच अहिंसक असहकारात्मक साधना असेल.

टागोर प्रेमाची भाषा बोलत. अहिंसा या शब्दाचा प्रयोग करणे गांधी पसंत करीत. प्रेम हा मोठा निसरडा शब्द आहे असे गांधींना वाटे. सर्वांशी अहिंसेने व्यवहार करावा; आप-परभेद करू नये, हे विश्वव्यापकतेचे तत्त्व अहिंसेत अनुस्यूतच आहे. खरे प्रेम हेही असेच असते. अलीकडे एकाने लिहिले की प्रेम ही 'एक निखळ व्यक्तिगत भावना' आहे आणि म्हणून 'सर्वांवर प्रेम ("युनिव्हर्सल लव्ह") ही केवळ बोलायची पोकळ गोष्ट होय.' गृहीतकृत्य बरोबर आहे पण त्यावरून काढलेला निष्कर्ष बरोबर नाही. प्रेम ही खरेच एक व्यक्तिगत भावना आहे. या अर्थाने की, व्यक्तीच्या हृदयात प्रेमाची भावना ओतप्रोत हवी – एरवी ते प्रेमाचे नाटकच तेवढे होते. आपल्या ओठावर तर प्रेमाची भाषा आहे, पण खरेच का आपल्या मनात प्रेमाची भावना आहे हे तपासून पाहावयाचे झाल्यास आतमध्येच डोकावून पाहयला हवे, हे बरोबर. पण, प्रेम सच्चे असायचे असेल तर ते काही विशिष्ट व्यक्तींवरच असायला हवे असा त्याचा अर्थ होत नाही. वास्तविक गोष्ट अशी की, काहींची निवड करून इतरांना वगळण्यावर कटाक्ष असलेले प्रेम लौकरच द्वेषामध्ये अधःपतित होते. हीच गोष्ट सदसद्विवेकाची पण. प्रचलित सामाजिक विधिनिषेधांचे पालन म्हणजे सदसद्विवेक नव्हे. सदसद्विवेक हा माझा स्वतःचा, मी स्वतः केलेला असला तरच खरा असतो, सच्चा असतो. पण सदसद्विवेक पक्षपात करीत नाही; कोणत्याही प्रसंगी वा व्यक्ती/समूह यांच्या संदर्भात विवेकाची कसोटी व रीत तीच एक असते, असायला हवी. ज्या प्रकारे गांधी अहिंसा हा शब्द वापरीत त्यावरून स्पष्ट होते की, प्रेम आणि निष्पक्ष न्याय यांचा सुरेख संगम त्यांच्या अहिंसेच्या ठायी झालेला होता.

या उन्नत अत्युच्च कोटीची अहिंसा व प्रेम सर्वसामान्य माणसांच्या आवाक्यातली गोष्ट नाही असा युक्तिवाद कोणी कोणी करील : 'आपल्या' माणसांशी प्रेमाने, अहिंसेने वागावे हे एक ठीक जमेल पण सर्वांशी, हे कसे जमणार? पण हे म्हणणे सर्वस्वी खरे नाही. द्वेष हा विकार जितका मानवी स्वभावप्रकृतीचा एक भाग आहे तितकाच सहानुभाव व करुणा याही मनुष्य स्वभावप्रकृतीमध्ये असलेल्या अंगभूत गोष्टी आहेत. गांधी हे काही सामान्य जीवनापासून दुरावलेले संत नव्हते. त्यांच्या टीकाकारांशी तुलना केली तर, त्यांच्या कितीतरी पटींनी सामान्य लोकांमध्ये राहून त्यांच्यासोबत गांधींनी काम केले असे दिसून येईल. जीवनाच्या वाटचालीत त्यांना अनेक वेळा हार पत्करावी लागली ही वस्तुस्थिती आहेच. असे असले तरी जी वाट ते चालले आणि स्वतःच्या उदाहरणाने व कार्यकर्तृत्वाने त्यांनी जी वाट दाखवून दिली तिचे, गतकाळच्या इतिहासात तर महत्त्व होतेच; पण मानवजातीच्या भवितव्याच्या दृष्टीनेदेखील कमालीचे महत्त्व आहे, प्रस्तुतता आहे.

अन्यायाचा अहिंसक प्रतिकार ही गांधीमार्गाची एक विशेषता आहे. रचनात्मक कार्यक्रम हा त्याच मार्गाचा अवलंब करण्याचा तेवढाच अंगभूत भाग आहे. दोन्ही मिळून गांधींचा मार्ग बनलेला आहे. त्यांपैकी एक वगळता येणार नाही. ग्रामस्वराज्याची पायाभरणी करणे हे त्यांच्या सर्व रचनात्मक कार्यक्रमांचे पायाभूत लक्ष्य होते. स्वयंशासित व स्वाश्रयी गावांची बांधणी व मजबुती करणे हे मध्यवर्ती उद्दिष्ट होते. प्रत्येक गावाने वा गावसमूहाने, व्यवहार्य असेल त्या प्रमाणात, स्वतःच्या पायाभूत आवश्यक गरजांची पूर्तता करण्यासाठी लागणाऱ्या वस्तू व सेवा यांचे उत्पादन करावे ही अपेक्षा बाळगलेली होती. काही वेळा ही संकल्पना साचेबंद, काटेकोर स्वरूपात तर काही वेळा अधिक लवचिक स्वरूपात मांडलेली आढळते. हा फरक का आढळतो हे समजून घेणे तितके अवघड नाही.

मुळात अहिंसक लढ्याच्या रेट्यामधूनच या संकल्पनेचा जन्म झाला. सामान्यतः शोषितांना स्वतःच्या उदरभरणासाठी

शोषकांवर अवलंबून राहावे लागते. या अवलंबनामध्येच शोषकाचे सामर्थ्य नेमकेपणे साठवलेले असते. असहकार यशस्वी व्हावयाचा असेल तर, हे अवलंबन दूर व्हायला हवे. परस्परांच्या सहकार्याने पार पाडलेल्या उत्पादक श्रमांच्या द्वारा अन्न, वस्त्र, निवारा, आरोग्य, शिक्षण या किमान गरजा ते भागवू शकत असले तर त्या आधारे मग अहिंसक लढा देणारे शोषितांचे समुदाय वळ प्राप्त करून घेऊ शकतात; त्या प्रमाणात ते स्वतंत्र व स्वायत्त बनतात. या अनुभवामधून मग कमालीच्या स्वाश्रयी ग्रामाचे अधिक काटेकोर प्रारूप मांडले गेले. अहिंसक लढाईची ही गांधींची अर्थ-राजनीती होती.

शोषित समुदायांनी लढ्याच्या यशासाठी स्वतःची बांधणी स्वाश्रयी 'ग्राम-समुदायां'मध्ये करावी याच मर्यादेत ही संकल्पना बंदिस्त ठेवण्याचे कारण नाही. अधिक शांततेच्या, स्थैर्याच्या काळातही एका नवीन समाजाचे प्रारूप म्हणून ग्राम-स्वराज्याची मांडणी करणे शक्य आहे. आधुनिक औद्योगीकरणाच्या ओघात, त्यासोबत आकारास आलेली आधुनिक राज्यसंस्था ही सत्तेचे कमालीचे केंद्रीकरण करते; केंद्रीभूत सत्ता हे तिचे एक व्यवच्छेदक वैशिष्ट्य आहे. सत्तेच्या राजकारणात आणि युद्धसज्जतेसाठी सैनिकीकरण व शस्त्रास्त्रस्पर्धा ('मिलिटरिझम') यात ती गुरफटून गेलेली आहे. लष्कर, शस्त्रास्त्रस्पर्धा, युद्धसज्जता यांमध्ये राज्यसंस्थेचे इतके हितसंबंध गुंतलेले आहेत कारण ही आधुनिक राज्यसंस्था भांडवलदारी हितसंबंधांचे रक्षण व संवर्धन करण्यासाठी बांधील आहे, असा युक्तिवाद मार्क्सवादी करतात. पण हे विश्लेषण सर्वस्वी बरोबर नाही. सत्तेचे राजकारण फक्त भांडवलशाही राष्ट्र-राज्येच करीत नाहीत. अन्य राष्ट्रांना अंकित करण्यासाठी, त्यांच्यावर कुरघोडी करण्यासाठी सत्तेचे जे राजकारण चालते त्याचे परिणाम साऱ्या मानवजातीच्या भवितव्याच्या दृष्टीने महत्त्वाचे आहेत. आधुनिककालीन संस्कृती व समाजव्यवस्था ('मॉडर्न सिव्हिलायझेशन') यामधून जी अनेक दुरिते उद्भवली आहेत त्यांच्या मुळाशी दोन गोष्टी आहेत. सत्तेसाठी चालणारी, कोणताही विधिनिषेध न पाळणारी स्पर्धा व त्यासाठी चालणारे राजकारण, आणि उपभोग्य वस्तूंचे सेवन करून सुखसंपादन करण्याची न शमणारी लालसा, या त्या दोन गोष्टी होत. गांधींना अभिप्रेत असलेल्या नवसमाजात ही दोन दुरिते असणार नाहीत. या कारणाने गांधी-विचाराचा भर स्वाश्रय आणि सत्तेचे विकेंद्रीकरण यावर आहे. मार्क्सवादी केंद्रीय राज्यसत्ता काबीज करण्यावर भर देतात, तर गांधी अहिंसक लढ्याला आणि रचनात्मक कार्याला. 'रचनात्मक कार्यक्रमा'च्या संकल्पनेचा जरा खोलवर विचार केला तरच गांधीविचाराचे मर्म नीटपणे ध्यानात येईल.

रचनात्मक कार्यक्रमाविषयी गांधी उत्साहाने बोलत, त्याची महती गात. गांधी म्हणतात, "आपल्यातील संघटन व कार्य-कुशलता रचनात्मक कार्यक्रम जागवील, त्याची अंमलबजावणी आपल्याला उद्योगी बनवील, तो आपणास स्वराज्यास पात्र बनवील." असहाय्य, दुबळ्या मनाने राज्य-संस्थेवर अवलंबून राहण्याची सवय आमच्या इतकी अंगवळणी पडली आहे की आपण पुढाकार घेऊन, स्वतःच्या भरवशावर व शक्तीवर कामे करू शकतो हा विश्वासच आमच्या ठायी उरलेला नाही; आम्ही पंगू झालो आहोत.

दारिद्र्यनिवारण आणि ग्रामीण विकास या क्षेत्रातल्या योजना शासनाने वरून पुढाकार घेऊन राबवायच्या म्हटले की दोन दोष निर्माण होतातच. काम नीटपणे पार पाडण्याची जबाबदारी शासनाची आहे अशी लोकांची धारणा बनल्याकारणाने काम चोख व्हावे याची नैतिक जबाबदारी आपली आहे याची जाण लोपते. नोकरशाही यंत्रणेचा विस्तारही पुष्कळ झाला आहे आणि ती पुष्कळ गुंतागुंतीचीही बनली आहे. जो पैसा वरील उद्दिष्टे साधण्यासाठी मंजूर केला जातो त्याचा बराच मोठा हिस्सा ही नोकरशाही यंत्रणा शोषून घेते. लोकांची कामे पार पाडण्यासाठी फार थोडा पैसा लोकांपर्यंत पोचतो. समाजाचे नैतिक मनोधैर्य उत्तरोत्तर अधिकाधिक पिचत, झिजत, मोडत गेला आहे. राज्यसंस्थेवरील अवलंबून राहण्याची वृत्ती व सवय मोडावी, लोकांमध्ये परस्पर सहकार्य वाढावे, लोक आत्मनिर्भर व्हावेत, स्वतःच्या सामर्थ्यावर त्यांनी भरभराट साधावी ही उद्दिष्टे पार पाडण्यासाठीचे साधन म्हणून, सामाजिक पुनर्बांधणी व पुनरुत्थानाचे साधन म्हणून गांधींनी रचनात्मक कार्यक्रमाची योजना केली होती.

भारतात बेरोजगारी व पुरेसे काम वर्षभर नसणे हा मोठाच जटिल बनलेला प्रश्न आहे. गांधींच्या विचारात या समस्येच्या सोडवणुकीला महत्त्वाचे स्थान होते. याबाबतीत गांधींची भूमिका समजून घेऊया. बेकारी माणसाला दोन वेगवेगळ्या प्रकारे खच्ची करते. त्याची मिळकत बंद होते; म्हणजे, त्याचे भौतिक नुकसान होते. त्याच वेळी बेकारी त्याची समाजातली प्रतिष्ठा कमी करते. कामच नसल्याने जबरदस्तीने माणसाला रिकामे

अनुक्रमणिका

वसून राहावे लागले की त्याच्या सवयी व त्याचे शील बदलते. त्याला नैतिक इजा पोचते. दरेक माणसात ऊर्जेचा एक साठा असतो जो, सामान्यतः, एक ना एका उत्पादक कार्यात वा प्रेमभावाने सेवा करण्यात कामी येणे गरजेचे असते. त्याने माणूस स्वस्थ व निरोगी राहतो. जर ऊर्जा अशी कामी लावली गेली नाही तर मोठा कंटाळा, वैताग माणसाला वेढतो आणि यामधून सुटका मिळविण्यासाठी ऊर्जेच्या विध्वंसक कार्यात वापर करण्याकडे माणूस वळतो. पुष्कळांच्या उत्पादक कार्यात त्यांची मनाने व शरीराने गुंतवणूक झाली नाही तर हिंसक कृत्यांकडे ती वळतात. समाजाचे स्वास्थ्य जर टिकून राहावयाचे असेल तर सक्षम प्रौढ माणसांना – सर्वांना – काम मिळण्याचे मोठेच महत्त्व आहे.

औद्योगीकरणाचे प्रमाण व वेग वाढविला तर वेरोजगारीची समस्या निवारली जाईल असे मानणारी मंडळी आहेत. त्यांच्याशी गांधींचा मतभेद होता. गांधींच्या मृत्यूनंतरच्या (म्हणजेच स्वातंत्र्याच्याही) पन्नास वर्षांचा अनुभव बघितल्यावर गांधींवर टीका करणाऱ्या अनेक विद्वानांपेक्षा गांधी सत्याच्या जास्त जवळ पोचले होते असे म्हणावे लागते. पंचवार्षिक योजना बनविणाऱ्यांच्या अपेक्षेपेक्षा वेरोजगारांमध्ये गेल्या काही दशकांमध्ये काळजी करावी अशी वाढ झालेली आहे. प्रत्येक पंचवार्षिक योजना बेरोजगारी घटविण्याचे अभिवचन देते. पण योजनेचा कालखंड संपतेवेळी बेकार लोकांच्या संख्येत वाढ होऊन अनुशेष मोठाच मागे राहिला असल्याची कबुली द्यावी लागते. एक उदाहरण देतो. १९६० च्या दशकाच्या अखेरीस चौथी पंचवार्षिक योजना तयार केली. या योजनेच्या पुस्तकात म्हटले होते, "उद्योगधंद्यांसाठी लागणारी यंत्रसामग्री व इतर साहित्य यांचे उत्पादन करण्याबाबतीत आपण आता जास्त स्वाश्रयी झालो आहोत, भांडवल गुंतवणुकीचे प्रमाण वाढले आहे, आणि औद्योगिक वाढीस परत एकवार चालना मिळाली आहे. याचे फलित म्हणून बेकारी कमी होऊन 'पूर्ण रोजगारा'ची – सर्वांना काम मिळण्याची – स्थिती उत्पन्न होण्याच्या दिशेने आपली वाटचाल होईल; तसेच व्यवसायांच्या संधींचे वैविध्य वाढेल. हे सर्व देशभर घडेल." औद्योगिक वाढ झाली की 'पूर्ण रोजगारा'ची स्थिती निर्माण होईल ही ज्यांची भूमिका होती त्यांच्या अपेक्षा व आशा प्रातिनिधिक स्वरूपात योजनाकारांच्या शब्दांमध्ये व्यक्त झाल्या असे म्हणता येईल. प्रत्यक्षात काय घडले याचा काही अंदाज आठव्या पंचवार्षिक योजनेच्या (१९९२-९७) पुस्तकातील पुढील मजकुरावरून येऊ शकतो : "गेल्या दोन दशकांमध्ये रोजगारांमध्ये दर वर्षी सुमारे २.२ टक्क्यांनी वाढ झाली आहे, तर श्रमिकांच्या संख्येमध्ये जास्त वेगाने (सुमारे २.५ टक्क्यांनी) वाढ होत राहिल्याने वेकारीच्या अनुशेषामध्ये वाढ होत आहे." आठव्या पंचवार्षिक योजनेच्या काळात याच गोष्टीची पुनरावृत्ती घडली. १९९६ मध्ये अंतरिम परीक्षणाचे फलित प्रसिद्ध केले गेले. "१९९२ ते ९५ या तीन वर्षांमध्ये प्रकट स्वरूपातील वेकारांच्या संख्येत, योजनाकाळाच्या आरंभीच्या १.७० कोटीपासून १.८७ कोटींपर्यंत १९९४-९५ च्या अखेरपावेतो वाढ झालेली आहे." असे त्या परीक्षणात म्हटलेय.

देशातली एकंदर रोजगारी सुमारे दर वर्षी २ टक्के या प्रमाणात वाढत आहे त्याच वेळी संघटित आधुनिक उद्योगांमध्ये रोजगारांतील वाढीचे प्रमाण याहून बऱ्यापैकी कमी आहे. १९७८-८८ या दहा वर्षांमध्ये दर वर्षी ०.९९ टक्के एवढ्याच प्रमाणात वाढ झाली असल्याचा अंदाज व्यक्त केला गेला आहे. आधीच्या दहा वर्षांच्या तुलनेत १९७८-८८ हा कालखंड सापेक्षतः जलद औद्योगिक विकासाचा होता ही गोष्टही ध्यानात घेण्यासारखी आहे.

आणखी एक मुद्दा आहे. पश्चिमी देशांमध्ये विकसित केले गेलेले कल्याणकारी राज्य हा भारतासारख्या देशातील बेरोजगारीच्या समस्येवरील उपाय होऊ शकत नाही. पाश्चिमात्त्य देशांमध्येही या उपाययोजनेमुळे बेरोजगारीचा प्रश्न सुटला आहे का, हा विवाद्य मुद्दा आहे. उत्पादक कामाच्या ऐवजी बेकारभत्ता देणे हा नियमित रोजगार देण्याची जागा घेऊ शकत नाही. तसे करता आले तरी ती गोष्ट नैतिक होणार नाही. परिस्थितीच्या वेगळेपणामुळे भारतात ही समस्या अधिकच गुंतागुंतीची बनलेली आहे. १९७८-८३ या काळासाठीच्या पंचवार्षिक योजनेच्या खर्ड्यात म्हटले होते, "कायमची बेकारी हा भारतातील बेरोजगारीच्या समस्येचा फार मोठा भाग आहे." आणि हे म्हणणे वास्तविक आहे.

कामाच्या शोधात असलेल्या गरजू श्रमिकांपैकी सापेक्षतः फारच थोड्या व्यक्ती वर्षभर बेकार राहतात. कोणताही एक आठवडा घेतला तर, त्या आठवड्यातील काही दिवस काम मिळाले आणि काही दिवस काम मिळाले नाही अशी लक्षावधी श्रमिकांची परिस्थिती असते. या परिस्थितीत काम मिळाले नाही अशा दिवसांसाठी भरपाई म्हणून भत्ता देऊ करणारी

*कोणतीही शासकीय योजना राबविणे ही गोष्ट इतकी किचकट* ठरेल की ती व्यवहार्य ठरणार नाही आणि प्रशासनयंत्रणेच्या ती आवाक्याबाहेरचीही गोष्ट ठरेल : वैकल्पिक दृष्टीने विचार करायला हवा, हे महत्त्वाचे आहे. 'रचनात्मक कार्यक्रमा'ची संकल्पना, ग्रामीण व्यवस्थेची पुनर्बांधणी व मजबुती करणारे कार्यक्रम या दिशेने विचार करायला हवा. आपल्या देशातील बेकारीच्या समस्येवरील तो पायाभूत इलाज ठरू शकेल. आपल्या देशात काम नाही म्हणून वापरली न जाणारी श्रमशक्ती फार मोठी आहे. तीही या मार्गाचा अवलंब केल्यास उत्पादक कार्यात कामाला येईल. इथे मग आपण परत गांधींपाशी येऊन पोचतो. त्यांनी भविष्यासाठी एक आयता तयार आराखडा दिला आहे अशातली गोष्ट नाही. पण त्यांच्या प्रतिपादनाच्या मुख्य रोखावर ध्यान केंद्रित केले पाहिजे.

मोठ्या आकारमानाच्या व मोठ्या प्रमाणावर उत्पादन करणाऱ्या उद्योगधंद्यांची गरजच नाकारली, त्या पद्धतीचा कोणताही उद्योग नसावाच अशी भूमिका घेतली तरच गांधींचे म्हणणे गंभीरपणे व प्रामाणिकपणे आपण विचारात घेतल्यासारखे होईल, असे मानण्याचे कारण नाही. पण विकासाची विभिन्न प्रारूपे व आकृतिबंध विचारात घेण्याची, त्यांची उपयुक्तता व त्यांच्या मर्यादा ध्यानात घेण्याची तयारी मात्र असली पाहिजे. मुद्दा काय आहे ते जरा खोलात जाऊन पाहूया.

आपल्या राष्ट्रीय अर्थव्यवस्थेत मोठ्या उद्योगधंद्यांनी स्वतःसाठी एक स्थान आज निर्माण केले आहे. यंत्रांद्वारे वस्तू उत्पादन करणाऱ्या उद्योगांचे ('मॅन्युफॅक्चरिंग') उदाहरण आपण घेऊ. उद्योगधंद्यांचा तो एक मोठा भाग आहे. त्याने मुद्दा स्पष्ट होईल. ठोकळ राष्ट्रांतर्गत उत्पादना ('ग्रोस डोमेस्टिक प्रॉडक्ट') मधील मॅन्युफॅक्चरिंग क्षेत्राचा हिस्सा १९५०-५५ च्या सुमारास १२ टक्क्यांहूनही कमीच होता. १९८० चे दशक संपता संपता तो २० च्या जवळपास इतका वाढला. यामध्ये नोंदणीकृत उद्योगांच्या संख्येतील वाढ नोंदणी न केलेल्यांच्या तुलनेत अधिक जलद गतीने झालेली आढळते. नजीकच्या भविष्यात या विभागातील उद्योगांच्या व्यवस्थापनात सुधारणा होईल अशी अपेक्षा राखायला हवी. भारताची निर्यात वाढणे, व तीही औद्योगिक उत्पादनांची वाढणे ही गरज आहे. यासाठी या विभागातले व्यवस्थापन अधिक चोख व कार्यक्षम होणे गरजेचे आहे. राष्ट्र-राज्यांच्या बनलेल्या आजच्या जगाची आमूलाग्र फेररचना होत नाही तोवर तरी मोठ्या आधुनिक उद्योगधंद्यांना अर्थव्यवस्थेतील त्यांच्या महत्त्वाच्या व वळकट स्थानावरून बेदखल करण्याची कल्पनाही करता येणार नाही. गांधींच्या निर्याणाला पन्नास वर्षे झालेली आहेत अशा वेळी, उद्योगधंद्यांचा हा विभाग आपण कसा मोडीत काढू शकू हे आपल्यासमोरचे कार्य नाही; तर, या विभागापासून आपण कोणत्या फळाची, लाभांची आशा/उमेद व्यवहारात बाळगू शकतो याचा अंदाज बांधण्याची व त्यापासून योग्य तो बोध घेण्याची गरज आहे.

औद्योगीकरणाच्या द्वारे भारतात एक नवी सांस्कृतिक दृष्टी व वळण रुजेल, प्राचीन समजुती व अंधश्रद्धा या विरून जातील, आणि लोकांची मने 'वैज्ञानिक वृत्ती'ने ('सायंटिफिक टेंपर') ओतप्रोत होतील ही आशा नेहरूंनी बाळगली होती. अवजड वस्तूंचे उत्पादन करणारे मोठे उद्योग आणि वैज्ञानिक प्रयोगशाळा ही त्यांच्या नजरेत आधुनिक तीर्थक्षेत्रे होती. ही आशा कितपत फलद्रूप झाली आहे ही तपासून पाहण्याचीच गोष्ट आहे.

आधुनिक तंत्रविज्ञानाने काय काय अद्भुत गोष्टी साधता येतात याचा अनुभव घेतल्यामुळे देशातील उच्चशिक्षित लोकच केवळ नव्हे तर सामान्यजनही दिपून गेले आहेत, पण 'वैज्ञानिक वृत्ती' त्यांच्या ठायी रुजली आहे असे काही म्हणता येत नाही. काही जुनाट समजुती क्षीण झाल्या आहेत, त्या निष्प्रभ ठरल्या आहेत खरे; पण आधुनिक औद्योगीकरणाच्या वाढ-विस्तारासोबत भ्रष्टाचारही सार्वत्रिकपणे बोकाळला आहे. उद्योगधंद्यांच्या या वाढीचे आणखी दोन घातक परिणाम झालेले आहेत. ऊर्जेची गरज वाढली आहे पण तिची निर्मिती पर्याप्त मात्रेमध्ये होऊ शकत नाही, आणि तिच्या निर्मितीमधूनही समस्या उत्पन्न होत आहेत. पर्यावरणीय तोल ढासळण्याचे व त्यामुळे विनाश ओढवण्याचे संकट, हा दुसरा परिणाम आहे.

या सगळ्यामधून उत्पन्न झालेले तीन मुद्दे आपण येथे विचारार्थ निवडू. ज्या समस्यांचा निर्देश वर केला आहे त्यांच्यामधील आंतरसंबंध हा पहिला. या कोंडीमधून, संकटामधून बाहेर पडण्याचा मार्ग कोणता, हा अटळपणे पुढे येणारा प्रश्न, हा दुसरा मुद्दा. शेवटी, या संदर्भात गांधीमार्ग अंगिकारणे कितपत प्रासंगिक व प्रस्तुत ठरेल; म्हणजेच गांधींचा विचार आणि संकल्पना आणि कार्यक्रम यांचे महत्त्व केवळ त्यांच्या

स्थलकालापुरतेच होते की जास्त व्यापक अशी अर्थपूर्णता व उपयुक्तता त्यांना आहे, हा तिसरा मुद्दा. निखळ स्थानिक दृष्टिकोन व्यापक समस्या सोडविण्याच्या दृष्टीने काम देत नाही. व्यापक पातळीवर प्रस्तुत दृष्टिकोन अंगिकारून स्थानिक विशिष्ट समस्या सोडविण्याचा विचार मात्र होऊ शकतो.

वेगवेगळ्या कारणांनी व्यापक समस्यांची आपली वोधना (पर्सेप्शन) अस्पष्ट राहते. दूरगामी हित साधण्यासाठी आजच्या काही लाभांवर पाणी सोडायची गोष्ट येते तेव्हा, "भविष्य इतके दूरवरचे असते की त्याचा आकार लघु होतो, त्याचे वजन व महत्त्व कमी होऊन जाते" असे एका थोर अर्थशास्त्रज्ञाने म्हटलेले खरे ठरते; लोक आजचे तेवढे पाहतात, भविष्याचा विचार लांव ठेवतात. शिवाय, प्रश्नाचे आकारमान व प्रभाव व्यापक, सार्वत्रिक असला तरी, वेगवेगळ्या भागांमध्ये त्याचा आघात सारख्याच तीव्रतेने होत नाही. तसेच, एकाच काळी सर्वच समस्या भेडसावू लागते असे नाही. काळाच्या बाबतीत मागे-पुढे असा प्रकार पण होताना दिसतो. सर्वांच्या दृष्टीने दूरदृष्ट्या हिताचे काय होईल असा विचार करून जे धोरण ठरविले असेल, त्या धोरणापोटी जी उपाययोजना सुचविली असेल ती पार पाडताना जो त्याग करावा लागतो तो कसा वाटून घ्यायचा याविषयी आघात होणाऱ्या विभिन्न गट, प्रदेश यांच्यात एकवाक्यता होणे कर्मकठीण होऊन बसते. कारण काही तीव्र आघात सोसत असतात तेव्हा काही अजून समस्याग्रस्त बनलेले नसतातही. खऱ्या अर्थाने सर्वांविषयी आत्मीयता वाळगणारा वैश्विक दृष्टिकोन अद्यापि विकसित झालेला नसल्याने ही समस्या उत्पन्न होते. ही स्थिती असल्याने, समस्येची सोडवणूक करण्याच्या बाबतीत प्रगती सावकाशच होईल हे स्वीकारले पाहिजे. पृथ्वीच्या हवामानात होणारे वदल, त्यांमधून उत्पन्न होत चाललेले संकट व त्याचे निवारण या विषयावर डिसेंबर १९९७ मध्ये क्योतो येथे भरलेल्या परिषदेत उत्तर व दक्षिण (गोलार्ध) – म्हणजे स्थूलमानाने सधन, विकसित विरुद्ध विकसनशील व गरीब – असे तट पडून वाद उपस्थित झाला. हे उदाहरण येथे देता येईल.

पृथ्वीवरचे तपमान वाढत चालल्याने जी संकटमालिका जगावर कोसळेल त्यात सर्वांचेच अहित होणार आहे या ज्ञानापोटी सर्वांच्याच समाईक आस्थेचा तो विषय बनला आहे; म्हणून तर सारे देश परिषदेत सहभागी झाले, असे म्हणणे वावगे होणार नाही. पण व्यवहार्य तोडगा/निकर्षाप्रत पोचणे त्यांना फारच कठीण गेले. १९९२ साली वातावरणाचे तपमान संतुलित राखण्यासंबंधात जो आंतरराष्ट्रीय करार झाला त्या अन्वये जगातल्या ३४ औद्योगिकदृष्ट्या प्रगत राष्ट्रांना वातावरणाचे तपमान वाढविणारे, बव्हंशी खनिज इंधने जाळण्यामधून उत्पन्न होणारे, ('ग्रीन हाऊस') वायू हवेत सोडण्याचे प्रमाण १९९०च्या पातळीपर्यंत खाली आणण्याचे लक्ष्य नेमून दिले गेले.

जागतिक पातळीवर साध्य करावयाच्या उद्दिष्टांच्या पूर्ततेसाठी, एका नव्या करारान्वये, तिसऱ्या जगातील गरीब व विकसनशील देशांनीही स्वतःवर काही बंधने घालून घ्यावीत, अशी बांधिलकी पत्करावी यासाठी अमेरिकेने प्रस्ताव मांडला तेव्हा, औद्योगिक विकासाच्या आजच्या टप्प्यावर असताना अशी बंधने घालून घेण्याची बांधिलकी पत्करण्यास तिसऱ्या जगातील राष्ट्रे राजी नव्हती. उदाहरणार्थ, चीनचा प्रवक्ता असे म्हणाल्याचे सांगितले जाते : "चीन या प्रकारच्या वायूंची जेवढ्या प्रमाणात हवेत भर घालतो तेवढी घालत राहिल्याशिवाय चीन तगच धरू शकणार नाही ('सर्व्हायव्हल एमिशन्स')." तर, त्याच्या मते, अमेरिकेच्या बाबतीत, तो देश हवेत घालीत असलेली या वायूंची भर ही 'चैनीचे जीवनमान कायम राखण्यासाठी' ('लक्झरी एमिशन्स') आहे. पण पृथ्वीचे तपमान जर वाढतच गेले तर तिसऱ्या जगातील काही देशांवर प्रथमतः तीव्र आघात होईल व त्यांना मोठ्या नुकसानीला सामोरे जावे लागेल ही शक्यता आहे.

मानवजातीच्या कल्याणाचा, भल्याचा विचार करताना मानवजातीचे वंश, राष्ट्र, धर्म इत्यादी कसोट्यांवर तुकडे पाडून आपल्या स्वार्थाचा, कल्याणाचा विचार करून चालत नाही; सर्व मानवजातीच्या हिताचाच विचार करायला हवा असतो. हे सत्य आजच्या इतके स्वच्छपणे पूर्वी कधी प्रतीत झाले नव्हते. पण राष्ट्रांचे हितसंबंध परस्परविरोधीच असतात, आणि प्रत्येक राष्ट्राने आपलेच हितसंबंध जोपासण्याची भूमिका घेणे इष्ट व आवश्यक असते या मागपासून आलेल्या धारणेच्या खरेपणाबद्दल इतकी पक्की खात्री राष्ट्रांना आजही वाटते की, ते त्या भूमिकेला अगदी घट्टपणे चिकटून आहेत. पृथ्वीचे तपमान वाढते आहे, ते एक जगावरचे संकट आहे व, तो एक तातडीचा प्रश्न आहे याविषयी बौद्धिक आकलन आणि त्याची वाटणारी नैतिक बोच (जी कृतीला उद्युक्त करते) यात फार मोठे अंतर पडत आहे. या कारणाने या प्रश्नाच्या

अनुक्रमणिका

सोडवणुकीच्या संदर्भात घेतल्या जाणाऱ्या निर्णयांची अंमलबजावणी हातचे राखून, टंगळमंगळ करीत केली जाण्याकडे प्रवृत्ती आढळली तर नवल नाही. मुळात कृती व धोरणे ठरविण्याच्या वेळीच सोयीस्कर तडजोडींनी ते निर्णयच चोख केले जाणार नाहीत ही शक्यता अधिक.

इतिहासाच्या या टप्प्यावर मूलगामी तत्त्वचिंतन करण्याची ख्याती असलेल्या विचारवंतांची/तत्त्वज्ञांची आजच्या घडीला प्रस्तुतता किती याचा निवाडा करताना व्यवहारातील या वास्तविक पार्श्वभूमीची दखल घ्यावी लागते. राष्ट्रीय समाजांतर्गत वा राष्ट्रा-राष्ट्रांमध्ये हितसंबंध कसे परस्परविरोधी असतात यावर भर देणारी कोणतीही सामाजिक-राजकीय-आर्थिक विचारप्रणाली एकांगी, कालविसंगत ठरते.

तिसऱ्या जगातील देशांमधील औद्योगीकरण, पर्यावरणाचे प्रदूषण आणि लोकसंख्येचा विस्फोट यांच्या आंतरसंबंधामधून काही गंभीर प्रश्न उपस्थित होतात. वर ज्या मुद्याचा ऊहापोह केला आहे त्या मुद्याला जोडून या आंतरसंबंधांचा विचार करू. वैद्यक शास्त्रातील काहीएक प्रकारचे शोध आणि आरोग्य-रक्षणाच्या सार्वजनिक व्यवस्थेतील सुधारणा यांच्यामुळे तिसऱ्या जगात मृत्यूचे प्रमाण बऱ्यापैकी खाली आले आहे. पण विभिन्न सांस्कृतिक धारणा आडव्या आल्यामुळे जन्मप्रमाण त्याच गतीने कमी झालेले नाही. एकंदर जगाचा विचार केला तर, पूर्वीच्या कोणत्याही शतकामध्ये या गतीने लोकसंख्या वाढली नव्हती. विसाव्या शतकात लोकसंख्या वाढीचा दर खूप अधिक राहिला आहे. लोकसंख्यावाढीचा एक अटळ परिणाम असा झालेला आहे की, मनुष्यवस्तीचे क्षेत्र विस्तारले आहे व जंगले तुटण्याची प्रक्रिया गतिमान झाली आहे. भारतात सर्वत्र ही प्रक्रिया वेगाने घडून येत आहे. हिमालयातील पर्वतराजींमध्ये, गंगा-यमुनांच्या खोऱ्यात, आणि पठारी अंतर्भागातही. हा प्रकार फक्त भारतातच घडतो आहे असे नाही. अन्य देशांची उदाहरणे पण इतकीच निषेधार्ह आहेत. याच्याच जोडीला, उद्योगधंद्यांमध्ये झालेला वाढ-विस्तार आणि खनिज इंधनांच्या वापराचे वाढलेले सार्वत्रिक मान यामुळे हवेतील घातक वायूंचे, विशेषतः कार्बन-डाय-ऑक्साइडसारख्या, प्रमाण वाढले आहे. आरोग्यावर याचे विपरीत परिणाम होत आहेत, इतरही धोके उत्पन्न झाले आहेत. जंगलतोडीमुळे पावसाच्या पाण्याचा प्रवाह व त्याची साठवण यात व्यत्यय उत्पन्न झाले आहेत, मोठ्या क्षेत्रांवरील जमिनीवरची सुपीक माती वाहून गेल्यामुळे जमिनी निकस बनल्या आहेत आणि पूर व अवर्षण यांचा फटका वारंवार बसण्याचे प्रमाण वाढले आहे.

लोकसंख्येची जास्त वेगाने होणारी वाढ हे बेरोजगारी व अर्धबेकारी यांचा अनुशेष सतत वाढत जात असल्याचे एक मोठे कारण आहे हे निर्विवाद. ही जागतिक पातळीवरची घडामोड आहे. वेगाने होणारी लोकसंख्यावाढ जगात सर्व देशांमध्ये घडून येत आहे असे नाही. पण या वाढीचे जे परिणाम होत आहेत ते कोणत्या एका प्रदेशापुरते मर्यादित राहात नाहीत. ग्रामीण भागात जी श्रमशक्ती अतिरिक्त ठरते तिच्यापैकी काही शहरांमध्ये स्थलांतरित होत राहते. तेथे पोटापाण्याचा काही उद्योग हाती येईल या आशेने. पुष्कळदा, अर्थपूर्ण रोजगार उपलब्ध करून देऊन स्थलांतरितांना स्वतःच्या व्यवस्थेत सामावून घेण्याची वाढत्या अंगाच्या शहरांचीही जी क्षमता असते तिच्यापेक्षा स्थलांतरितांचे प्रमाण जास्त असते. या अतिरिक्त श्रमशक्तीपैकी काही भाग परदेशांमध्ये कामधंद्याच्या शोधात स्थलांतर करतो. पण एका मर्यादेनंतर जो तो देश अशा स्थलांतराला अटकाव करतो. पुष्कळ प्रकरणी, या अटकावाला एक वंशवादी वळण आढळून येते : अमुक वर्णाचे, वंशाचे, संस्कृती/धर्म असलेले लोक आपल्यात नकोत, असे. त्या त्या देशातले सांस्कृतिक व राजकीय वातावरण मग गढूळ बनते. ताणतणाव वाढतात. अलीकडच्या काही वर्षांमध्ये 'जागतिकीकरणा'ची ('ग्लोबलायझेशन') भाषा बरीच केली जात आहे. जागतिकीकरणाच्या कट्टर पुरस्कर्त्यांना देखील शंभर टक्के, पूर्ण जागतिकीकरण नको असते : भांडवलाचा ओघ कुठूनही कोठेही खेळता राहायला हवा असा त्यांचा आग्रह असतो, पण हीच मोकळीक श्रमशक्तीलाही असावी हे त्यांना नक्कीच नको असते. हे अर्धवट जागतिकीकरण काम देणार नाही. वेगळ्या वर्णाच्या, वंशांच्या, धर्म-संस्कृतींच्या श्रमिकांचे मुक्त स्थलांतर व्हायला देण्याच्या आड मानवी सहिष्णुतेचीही एक मर्यादा अखेरीस येते असे जर म्हणणे असेल, तर मग त्याच नाण्याला एक दुसरी बाजूही आहे ही गोष्ट समजून घ्यायला हवी. ज्या त्या देशात-प्रदेशात जी श्रमशक्ती रोजगाराच्या शोधात असेल त्या श्रमशक्तीचा जास्तीत जास्त उत्पादक उपयोग करून घेण्याच्या दृष्टीने आर्थिक-औद्योगिक विकासाचा जो मार्ग अवलंबणे शक्य होईल त्या मर्यादेतच भांडवलाचे जाणे-येणे राखणे, भांडवली जा-येला






पूर्ण मोकळीक न ठेवणे ही गोष्टही तर्कसंगत आहे हे मग स्वीकृत व्हायला हवे. ग्रामीण विकासाचे एक नवे प्रारूप यामधून पुढे येते. या प्रारूपाची उद्दिष्टे साध्य व्हावयाची असतील तर भांडवलाच्या 'हालचालीं'वर नकारात्मक नियंत्रणे घालणे पुरेसे ठरणार नाही. पुष्कळ मूलग्राही विचार व कृती यांची आवश्यकता राहील.

ग्रामीण भागातील बैठ्या, वेकार मनुष्यबळाचा वापर करून उपयोगी उत्पादक भांडवली मालमत्ता ('कॅपिटल ॲसेटस') कमी भांडवली खर्चात निर्माण करता येते ही जुनी सुपरिचित कल्पना आहे. घोडं मग कुठं पेंड खातंय? कोणत्या गोष्टींना, उद्दिष्टांना अग्रक्रम द्यायची गरज आहे त्याविषयी स्पष्ट कल्पना नाही. योग्य प्रकारचे संघटनांचे/संस्थांचे पाठबळ नाही. आणि समोर ठेवलेली उद्दिष्टे पार पाडण्यासाठी आवश्यक त्या आशयाची शिक्षणव्यवस्था निर्माण केलेली नाही. आता या तीन गोष्टी जर घडून आल्या तर एक क्रांतीच घडून येईल. ही वरील उद्दिष्ट साध्य न होण्याची कारणे आहेत.

सर्व क्षेत्रांना लागू पडेल असा आराखडा अशा बाबतीत असू शकत नाही. प्रत्येक क्षेत्राची ठेवण, गरजा, परिस्थिती, साधनसंपत्ती वेगवेगळी असते. स्थानविशिष्ट अशीच उदाहरणे घेता येतात. योग्य नेतृत्व जर लाभले तर, करता येतील अशा उत्पादक रचनात्मक कार्यांचे वेगवेगळे प्रकार आणि व्याप्ती यांना मर्यादाच नाही. आत्मनिर्भर, स्वयंशासित गावसमाज ('कम्युनिटी') या कामांचे व्यवस्थापन करू शकते. असा कार्यक्रम राबविल्यास लोकांचा आत्मविश्वास वाढेल. चुकीच्या पण प्रभुत्व गाजविणाऱ्या, माणसांच्या स्वतःच्या शक्ती व क्षमतेवरील विश्वास उडविणाऱ्या कल्पना लोकांच्या मनावर आज भुतासारख्या स्वार झालेल्या आहेत. त्यांच्या पकडीमधून लोकांना सोडविणे शक्य होईल.

भारताच्या अनेक भागांत अतिरिक्त ग्रामीण मनुष्यबळ विखुरलेल्या स्थितीत तसेच पडून आहे. सहकार्याने अनेक लहानमोठी कामे हाती घेऊन त्यांचा उत्पादक-सर्जक विनियोग करता येणे शक्य आहे. महाराष्ट्राच्या पुरंदर तालुक्याच्या क्षेत्रात श्री. विलासराव साळुंखे यांनी उभ्या केलेल्या 'पाणी पंचायत'च्या कामाचे उदाहरण देता येईल. पावसाचे पाणी ज्या त्या ठिकाणी पकडून-साठवून ठेवण्यासाठी तळी खोदणे, बंधारे घालणे, जुनी नादुरुस्त तळी दुरुस्त करणे यासारखी कामे गावोगाव करता येण्यासारखी आहेत. नद्यांचे प्रवाह अडवणारी धरणे बांधून, साठविलेले पाणी दूरवरच्या भागात कालव्यांद्वारे नेण्याच्या प्रचलित पद्धतीमध्ये काहींचा लाभ होतो, पण इतरांचे नुकसान होते. त्यामुळे प्रदेशप्रदेशामध्ये तंटेबखेडे उपस्थित होतात. एकाच समाजातीलही लाभधारक विरुद्ध विस्थापित यांच्यात कलह उत्पन्न होतो. गावोगाव रोजगाराची गरज असलेली जी अर्धबेकार माणसे आहेत त्यांना आपल्या गावाजवळ काम मिळावे ही गरज असते. असे काम जास्तीत जास्त लोकांना पुरविण्याच्या दृष्टीने मोठ्या धरणांचे प्रकल्प कार्यक्षम ठरत नाहीत. जिथे पाऊस पडतो तिथेच पाण्याचे लहान-लहान साठे एकदा उत्पन्न केले आणि त्यांच्या देखभालीची चोख व्यवस्था उभी केली की त्या पाण्याचा कार्यक्षमतेने व काटकसरीने कमाल वापर करून पिके घेण्याचे प्रकल्प राबविता येथील वा धरती हिरवाईने आच्छादित करता येईल. झाडांच्या जातींची योग्य निवड केल्यास फळांचे, इंधनाचे उत्पादन गावांच्या उपयोगासाठी वाढविता येईल. तळ्यांमध्ये मासळीचेही उत्पादन थोडक्या खर्चात करता येईल. हे काम गावकरी स्वतःच करू शकतात. कमी खर्चिक सुलभ पद्धतींचा वापर करून गाव स्वच्छ कसे ठेवावे, स्वच्छ ठेवून आरोग्याचे संवर्धन कसे करावे या विषयात पुष्कळ काम झाले आहे. त्याचे तंत्रविज्ञान प्रमाणित झाले आहे. आपली खेडी स्वच्छ, सुंदर व आरोग्यसंपन्न बनविण्यासाठी ग्रामीण अर्धबेकार श्रमशक्तीच्या आधारे पुष्कळ कामे पार पाडता येण्यासारखी आहेत. त्याचे अनेक फायदे आहेत. अनेक रोगराईंचे प्रभावी निर्मूलन त्याद्वारे होईल. सेंद्रिय खतही निर्माण होईल व शेतीसाठी आज उपलब्ध असलेल्या खताच्या पुरवठ्यात लक्षणीय भर पडेल. सर्वांच्या आस्थेच्या काही समस्यांच्या सोडवणुकीच्या दृष्टीने उपयोगी अशा वैज्ञानिक दृष्टी व वृत्ती विकसित व्हायला त्यामधून मदत होते. मैलासफाईच्या कामाचे सगळे संदर्भच क्रांतिकारक स्वरूपात बदलून टाकता आले तर, जातपातीला दुबळे करण्याची शक्ती या कार्यक्रमांमधून उत्पन्न होण्याची आशा बाळगता येते.

गावागावांमधून काम नाही म्हणून बसून राहणाऱ्या लोकांच्या श्रमशक्तीचा वापर करून घेणे एवढाच उद्देश डोळ्यासमोर ठेवून प्रकल्पांची समताधिष्ठित निवड करावयाची नाही. आत्मनिर्भर, स्वाश्रयी (पण इतर-विन्मुख नव्हे), सहकारी वृत्तीचे असे, एक नव्या रूपात खेड्यांची बांधणी ज्यांमधून होणार आहे असे श्रमशक्ती-आधारित प्रकल्प निवडण्यावर

भर असेल. भांडवलशाही चौकटीच्या पलीकडे जाणारी ही रचना तर असेलच, पण राज्यवादी समाजवादा ('स्टेट सोशलिझम') चीही मनावरची पकड सुटेल. हे सगळे चित्र फार मनोराज्यात्मक ('यूटोपिअन') आहे म्हणून ते निकालात काढणे सोपे आहे. आजची व्यवस्था फार वेगाने असंतुलित बनून कडेलोटाकडे चालली आहे; ती टिकणारी नाही, हे आता अगदी स्पष्ट झाले आहे. प्रचलित व्यवस्थेची जागा घेऊ शकेल असा दुसरा पर्याय खरोखर उपलब्ध आहे का?

ग्रामीण भागात राबवावयाच्या रचनात्मक कार्यक्रमांना शिक्षण व विभिन्न क्षेत्रांतील कौशल्य/तंत्रज्ञान यांचे प्रशिक्षण यांची जोड देऊन ग्रामीण समाजाचा भौतिक व सांस्कृतिक वैचारिक पाया मजबूत केला पाहिजे, ही गोष्ट अगदी स्पष्ट आहे. अविवेकी, घातक अशा सामाजिक चालीरीतींचा अहिंसक प्रतिकार यालाही या पुनर्घटनात्मक रचनात्मक कार्यक्रमामध्ये महत्त्वाचे स्थान असेलच.

हे परिवर्तन एका रात्रीत देऊळ बांधले जाण्यासारखे त्वरित घडून येणार नाही; त्याला दीर्घ काळ लागणार आहे. आधी राज्यक्रांती व नंतर आमूल परिवर्तनाची एक मोठी छलांग, हनुमान उडी ही प्रतिमा दिशाभूल करणारी आहे. संक्रमण-काळामध्ये जुनी प्रचलित व्यवस्था नव्या उदयोन्मुख व्यवस्थेच्या बरोबर नांदणार आहेत. 'आधुनिक' आणि 'आधुनिकोत्तर' हे शब्द वापरा हवे तर. या दोन व्यवस्थांच्या गरजा आणि मागण्या परस्परांशी संवादी नाहीत. मेळ न खाणाऱ्या असल्या तरी, दोन्हींची पूर्तता एकाच वेळी दीर्घ काळपर्यंत करीत राहावी लागणार आहे. याला आपण तयार असले पाहिजे. या संक्रमणकाळाच्या गरजा पूर्ण करणारे कोणते तरी एक बाळबोध व सर्वत्र लागू करता येईल असे एकछाप धोरण असणार नाही. सगळी गुंतागुंत आपणांस स्वीकारून काम करावे लागणार आहे.

रिझर्व्ह बँक ऑफ इंडियाचे गव्हर्नर राहिलेल्या एका नामवंत अर्थशास्त्रज्ञांनी काही दिवसांपूर्वी लिहिले की, "धोरणांचा एक संच 'योग्य' आणि बाकीचे सगळे 'अयोग्य', म्हणजेच वाद, अशा प्रकारे विचार करण्याची अर्थशास्त्रज्ञांना सवय आहे. खरे जग कितीतरी अधिक जटिल आहे.." पुढे त्यांनी म्हटले, "संपूर्ण अर्थव्यवस्थेतला संसाधनांचा वापर एकंदरीने अधिक कार्यक्षमतेने होण्यासाठी 'सर्वसामान्य' धोरणांचा अंगीकार करण्याची जशी गरज आहे तशीच निर्यात वाढविण्यासाठी अग्रक्रमाने झुकते माप देणाऱ्या 'विशेष' धोरणांचीही गरज आहे." आता हे म्हणणे तसे ठीकच आहे. पण इथेही अर्थव्यवस्थेच्या फक्त तथाकथित आधुनिक विभागाचाच तेवढा विचार केला गेलेला आहे. अधिक शहाण्या व चिरस्थायी अर्थरचनेच्या दिशेने वाटचाल करावयाची असेल तर मामला जास्त गुंतागुंतीचा आहे. विभिन्न उद्दिष्टे साध्य करणाऱ्या धोरणांचे मिश्रण अधिक वैविध्यपूर्ण राखावे लागेल, आणि रिझर्व्ह बँकेच्या गव्हर्नरांच्या शिफारशीमधून अभिव्यक्त होणाऱ्या मर्मदृष्टीपेक्षा अधिक खोलवर व दूरवर पोचणारी मर्मदृष्टी प्रकट करावी लागेल. नेहरूछाप समाजवादी वळण थोडे जास्त खुले, निर्बंधरहित करण्याने भागणार नाही.

आपणास गांधींचा स्वीकार अधिक हेतुपूर्वक करायला हवा आहे. किंबहुना, त्यांच्या विचारांचा विकास आज बदललेल्या संदर्भात, गरजेनुसार घडवून आणावयास हवा.

सावधानीचा एक इशारा देण्याची गरज आहे. अशी कोणतीच अर्ध-राजनैतिक व्यवस्था ('सिस्टिम ऑफ पोलिटिकल इकॉनॉमी') नाही जी भ्रष्ट होऊ शकत नाही; भ्रष्टाचार कोणत्याही व्यवस्थेला ग्रासू शकतो. मार्क्सची हाक बाहेरचे जग बदलण्यासाठी होती. आपण अंतर्मुख होऊन स्वतःची अंतःशुद्धी प्रथम करूया, स्वतःपासून बदलाला सुरुवात करूया आणि जगाचे परिवर्तनही त्यामधूनच सत्याग्रहाच्या स्वाभाविक गतिकीने घडून येईल, अशी गांधींची शिकवण होती. सदैव जाग्रत राहण्यास त्यांनी शिकविले.



# गीतार्थ–विनिर्णय

## कर्म, ध्यान, भक्ती आणि ज्ञान

**कुंदर दिवाण**

गीतेत प्रत्येक अध्यायच योग म्हणजे साधन म्हटला आहे. सिद्धी म्हणजे अन्तिम प्राप्तव्य. ते आहे ब्रह्मनिर्वाण म्हणजे ब्रह्मरूप शान्ती. त्यासाठी प्रथम जीवाची जी आजची अवस्था आहे – आधि-व्याधि-उपाधि वा सत्त्व-रज-तम या त्रिविध उपद्रवांनी ग्रस्त स्थिती – तिचा विषाद वाटणे. म्हणून पहिला अध्याय विषादयोग म्हटला आहे. दुसरा अध्याय आहे अन्तिम प्राप्तव्य जे ब्रह्मनिर्वाण तिथे पोचविणारा सांख्ययोग म्हणजे ज्ञानयोग. हे झाले आरंभक व समापक बिन्दु संपूर्ण गीताध्यायरूप योगशास्त्राचे. पुढे क्रमाने (३, ४, ५ हे अध्याय) कर्मयोग, (६, ७, ८ अ.) ध्यानयोग, (९, १०, ११, १२ अ.) भक्तियोग आणि शेवटी मुख्य प्रतिपाद्य असा (१३, १४, १५ अ.) ज्ञानयोग. पुढील (१६, १७ अ.) हे शुभवृत्ती आणि शुभकृती यांचे प्रतिपादक अध्याय परिशिष्टरूप असून १८ वा अध्याय हा कलशाध्याय, गीतार्थाचा समारोप आहे. तो म्हणायचा प्रसादयोग. गीतेला उपनिषत् म्हटले आहे. म्हणजे वेदान्त. 'इति गुह्यतमं शास्त्रम्' (अ. १५.२०) पुरुषोत्तमयोग म्हणून या १५ व्या अध्यायाला सारभूत मानिले जाते. इथेच प्रथम शास्त्र शब्दही आला आहे. म्हणजे वेदान्त हेच शास्त्र. म्हणजे गीतेचे मुख्य वा अन्तिम प्रतिपाद्य ब्रह्म असून ज्ञान हेच त्याचे एकमात्र साधन आहे. दुसऱ्या अध्यायाला म्हणूनच सांख्ययोग म्हटले आहे. इतर सर्व योग – म्हणजे साधने – दुय्यम होत, पूरक होत.

शंकराचार्य जे ज्ञानयोगावर आणि संन्यासावर – म्हणजे कर्मसंन्यासावर – भर देतात त्याचे कारण ते ब्रह्म कार्य – म्हणजे काही कर्म - करून मिळवायचे – नाही किंवा आप्य - म्हणजे दुसरी-कडून कुंठून आणायचे, मिळवायचेही – देखील नाही, तर ते ब्रह्म आपण स्वतःच आहो हे ओळखणे आणि या जीवनात तदनुसार वागणे होय. म्हणून ते म्हणतात,

*ब्रह्म सत्यं, जगत् मिथ्या जीवो ब्रह्मैव नापरः।*
*अनेन वेद्यं सत् – शास्त्रं इति वेदान्त-डिण्डिमः।।*

गीतेत एवढ्यासाठीच म्हटले आहे –

*इति गुह्यतमं शास्त्रम् इदं उक्तं मयाऽनघ।*
*एतद् बुद्ध्वा बुद्धिमान् स्यात् कृतकृत्यश्च भारत।।*

हे ओळखील तोच बुद्धिमान् होईल म्हणजे ब्रह्मज्ञ होईल. आणि मग त्याला काही कर्तव्य, काही एक करायचे उरणार नाही. तोच सर्वज्ञ, तोच कृतकृत्य झाला.

मग गीतेत तर अनेक योग सांगितले आहेत ते कशासाठी? ते सर्व योग सांगितले आहेत ज्ञान-योग्यता मिळवण्यासाठी. ज्ञानासारखे पवित्र म्हणजे अज्ञाननिवारक दुसरे काहीच नाही. 'नहि ज्ञानेन सदृशं पवित्रं इह विद्यते। तत् स्वयं योग-संसिद्धः कालेनात्मनि विन्दति।।' योग-संसिद्धाला ते ज्ञान स्वतःच मिळते. आणि म्हणून ते सर्व योग – म्हणजे सर्व साधने – आदरणीय होत, सेवनीय होत, उपकारक होत. कर्म उपकरण आहे, करण नाही; ध्यान उपकरण आहे, करण नाही; भक्ति उपकरण आहे, करण नाही. करण – म्हणजे प्रत्यक्ष साधन - एक ज्ञानच आहे. नेत्राने दिसते तेच करण आहे, उपनेत्राने नव्हे. ते उपकरण मात्र आहे, सहायक आहे. नेत्रहीनाला – आंधळ्याला – उपनेत्र काही कामाचे नाही. देहवंताला देह आहे तेव्हा कर्म करणे भाग आहे. ते कसे करावे ते शास्त्र सांगते. 'तस्मात् शास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ। ज्ञात्वा शास्त्रविधानोक्तं कर्म कर्तुं इहार्हसि।।' देहवंताला मनही आहे. त्यालाही नियमित केले पाहिजे म्हणजे ते भटकणार नाही. म्हणून ध्यानयोग उपयोगी. म्हणूनच म्हटले आहे –

*ध्यानेनात्मनि पश्यन्ति केचित् आत्मानं आत्मना।*
*अन्ये सांख्येन योगेन कर्मयोगेन चापरे।।*
*अन्ये त्वेवं अजानन्तः श्रुत्वान्येभ्य उपासते।*
*तेऽपि चातितरन्त्येव मृत्युं श्रुतिपरायणाः।।*

इथे कर्मयोग, ध्यानयोग, भक्तियोग आणि ज्ञानयोग चारी सांगितले आहेत. कर्मयोगाने देहाला, ध्यानयोगाने मनाला, भक्तियोगाने हृदयाला वश केले म्हणजे ते ज्ञान, ती आत्मानुभूती होते. आणि ती आत्मानुभूतीच आत्मज्ञान, ब्रह्मज्ञान होय. स्वानुभूती हेच एक प्रमाण आहे. आणि तेच विज्ञान आहे. विज्ञान म्हणजे आत्म्याचे आत्म्याला आत्म्याने होणारे स्वानुभूतिरूप ज्ञान. म्हणून भर्तृहरीने ठीकच म्हटले आहे –





*दिक्कालाद्यनवच्छिन्नानन्तचिन्मात्रमूर्तये।*
*स्वानुभूत्येकमानाय नमः शान्ताय तेजसे।।*

'घोटवीन लाळ ब्रह्मज्ञान्या हातीं। मुक्ता आत्मस्थिति सांडवीन' असे तुकारामाने भक्तीचे महिमान गाइले आहे खरे, पण ते केवळ गौरवगान आहे. 'आत्मन्येवात्मना तुष्टः स्थितप्रज्ञः स उच्यते।' आत्मज्ञाला, ब्रह्मज्ञाला आपल्या बाहेर दुसऱ्या कशाचीच क्षणभरही अपेक्षा, कणभरही अपेक्षा असत नाही. तो आपल्याच ठाई परिपूर्ण संतृप्त असतो. त्याला लाळ घोटायला लावण्यालायक त्रिभुवनांत काहीच नाही. त्याचे वर्णन उपनिषदे असे करतात :

*कविर् मनीषी परिभूः स्वयंभूः*
*(याथातथ्यतः)अर्थान् व्य(द)धात् शाश्वतीभ्यः समाभ्यः।*
*स पर्यगात् शुक्रं अकायं अव्रणं*
*अस्नाविरं शुद्धं अपापविद्धम्।।*

[टीपः श्लोकात याथातथ्यतः हे पद घुसडून दिलेले दिसते. 'अपि माषं मषं कुर्यात्। छन्दोभङ्गं न कारयेत्' अशी छांदसांची धारणा आहे. वेदांत उपनिषदांत अपच्छन्दस्क रचना मूलतः बरीचशी सुचक आहे. इतरांनी ती विघडविली असावी. वेदाचा आद्य मंत्र गायत्री हा असा म्हटला जात असावा –

*तत् सवितुर् वरेणिअम्*
*भर्गो देवस्य धीमहि।*
*धियो यो नः प्रचोदयात्।।*]

कर्माने, ध्यानाने, भक्तीने क्षणभर वा मुहूर्तभर तल्लीनता होईल पण त्यानंतर परत गुणांचा – सत्त्व, रज, तम या गुणांचा – अंमल त्याच्यावर होऊ च शकतो. परंतु ज्ञानाने ज्ञानी निर्गुणावस्था, जी कैवल्यरूप असते, तिच्यातच राहील. तो ज्ञानाने देही असून देहधर्मापासून अलिप्त राहील. देह सुखदुःख भोगत असतानाही केवळ द्रष्टृत्वामुळे त्यापासून सर्वथा मुक्त असेल. ही स्थिती ज्ञानाशिवाय दुसऱ्या कोणत्याही योगाने साधणारी नाही, संभवनीय नाही. म्हणूनच म्हटले आहे 'ज्ञानादेव तु कैवल्यम्', द्रष्टृत्व हे 'द्रष्ट्याला सोडून कधी राहणेच शक्य नसल्यीने तो द्रष्टा सर्वथा दृश्याच्या कुठल्याही अवस्थेपासून अस्पृष्ट असतो आणि त्यासाठी त्याला कसलेही कर्म, ध्यान वा भक्ति करावी लागत नाही'. तो त्या सर्वांपासून मुक्त असतो. याचेच नाव कैवल्य. यात कसलेही प्रकार नाहीत; सलोकता, सरूपता, समीपता वा सायुज्यताही म्हणता यावयाचे नाही. ते कैवल्य केवळ अनन्य एकरूप होय. द्रष्टृत्व-स्वरूपाची अनुभूती ज्यामुळे होते ते एकमेव अनन्य ज्ञानच होय. दुसऱ्या कुठल्याही प्रकारे ते होत नाही. कर्म-फलत्यागरूप कर्मयोगाने, निर्विकल्प समाधिरूप ध्यानयोगाने आणि पूर्ण समर्पणरूप भक्तियोगाने जे साधते ते केवळ ज्ञान-निष्ठोपकारकता मात्र होय. द्रष्टृत्वस्वरूप ज्ञान होते ते केवळ ज्ञानानेच होय. नगर-कोटाच्या एकमात्र प्रवेशद्वारातूनच ज्याप्रमाणे नगरात प्रवेश होतो त्याप्रमाणे आत्मज्ञान, ब्रह्मज्ञान होते ते केवल एकमात्र ज्ञानानेच होय. 'नगर भ्रमता जन्म जावो, परि प्रवेश एक्या द्वारे रे' असे जे ज्ञानदेवांनी म्हटले आहे ते हेच होय. वेदान्तडिण्डिमात शेवटी जे म्हटले आहे – 'अनेन वेद्यं सत् शास्त्रम्' ते त्यामुळेच होय. इतर कोणत्याही शास्त्राला मुळी शास्त्र ही पदवीच मिळू शकत नाही. 'सत् शास्त्र' केवळ ज्ञानयोगच.



---

**चुकीची दुरुस्ती**

*नवभारत*, मार्च १९९९, अंकात प्रा. बन्दिष्टे यांच्या *न्यू ह्यूमनिझम : ए रेव्होल्यूशनरी फिलॉसफी* या पुस्तकाच्या श्री. विश्वास नाईकनवरे यांनी केलेल्या परीक्षणात प्रा. अमर्त्य सेन यांच्या लेखातील (दै. टाइम्स ऑफ इंडिया, ८.२.९९) मजकूर अवतरणात दिला आहे.

'I think that tradition of heterodoxy, of questioning, is *a very important part of Indian past*.... असे हवे. चुकीने वाक्याचा अधोरेखित भाग 'a very important past of Indian part' असा छापला गेला आहे. चुकीबद्दल माफी असावी.

– *संपादक*

वादसंवाद

# अंधश्रद्धा निर्मूलनाचे कार्य युरोपमधील प्रबोधनाच्या चळवळीच्या तोडीचे

टी.बी. खिलारे

'अंधश्रद्धा निर्मूलनाच्या कार्यातले पथ्यापथ्य' याविषयी *नवभारत*मध्ये (जानेवारी १९९९) लिहिलेले संपादकीय वाचले. जवळ-जवळ सुरुवातीपासून अंधश्रद्धा निर्मूलनाच्या चळवळीत सहभागी असलेला कार्यकर्ता म्हणून मी आपल्या लेखाला उत्तर देण्याचा प्रयत्न करतो.

सर्वप्रथम वसंत पळशीकरांचा जो एक गैरसमज झालेला आहे तो दूर करतो. अंधश्रद्धा निर्मूलन समिती (*अंनिस*) ज्या अंधश्रद्धांच्या निर्मूलनासाठी प्रयत्नशील आहे, त्या केवळ धर्म व धार्मिक व्यवहार यांच्या क्षेत्रातील आहेत असे नव्हे, तर भूत, भानामती, आहार व वैद्यकीय अंधश्रद्धा तसेच फलज्योतिष, वास्तुशास्त्र, संमोहन इत्यादी अनेक अधार्मिक क्षेत्रांतील अंधश्रद्धाही दूर करण्याचा प्रयत्न समिती करते. अंधश्रद्धा, मग त्या कोणत्याही क्षेत्रातील असोत, त्याला धार्मिक-अधार्मिक आणि लेबले न लावता ती 'अंधश्रद्धा' आहे याच दृष्टिकोनातून पाहिले जाते.

पळशीकरांनी *अंनिस*वर अनेक आक्षेप घेतले आहेत. कार्यकर्त्यांनी लोकांमध्ये काम करताना कोणती पथ्ये पाळावीत याबद्दल सल्लाही दिला आहे. *अंनिस*ने केलेली कोणती कृती किंवा प्रकाशित केलेल्या पुस्तकातील कोणत्या विचारांमुळे पळशीकर लेख लिहिण्यास कारणीभूत झाले, याचे एकही उदाहरण त्यांनी दिलेले नाही. इष्ट साध्य गाठण्यासाठी कोणत्या अनिष्ट साधनांचा वापर समितीने केला, हे ते सांगत नाहीत. अलीकडेच शनि-शिंगणापुरच्या अंधश्रद्धेबद्दल समितीने कृतिशील पाऊल उचलले होते. ही घटना लेख लिहिण्यास कारणीभूत असावी, असे आम्ही गृहीत धरतो.

'घराला दारे नसतानाही चोऱ्या होत नाहीत; चोऱ्या झाल्याच तर चोराचे डोळे जातात', या अंधश्रद्धेबद्दल *अंनिस*ने आवाज उठवला होता. खरे तर गेल्या तीन वर्षांपासून असंख्य भाषणांद्वारे, पुस्तिका छापून, व नगरमध्ये झालेल्या मराठी साहित्य-संमेलनाच्या निमित्ताने शनि-शिंगणापूरच्या अंधश्रद्धेबद्दल प्रबोधन केले होते. यावर्षी प्रत्यक्ष कृतीद्वारे यातले मिथ्य बाहेर काढावयाचे* व सत्य उघड करायचे, या उद्देशाने 'चला शनि-शिंगणापुरला चोरी करायला', अशी कार्यकर्त्यांना हाक दिली होती. 'चोरी केली तर अंधत्व येते,' हा पद्धतशीरपणे पसरवलेला भ्रम दूर करावा, भाविकांची व पर्यटकांची अनेक प्रकारे होणारी दिशाभूल थांबावी व शोषणाला आळा बसावा व व्यापक जनजागृती व्हावी या उद्देशाने *अंनिस*ने कृतिशील पाऊल उचलले. परंतु याचा अर्थ समिती चोरीचे समर्थन करते असा नव्हे; तर जाणीवपूर्वक व पद्धतशीरपणे पसरवलेला भ्रम लाक्षणिक म्हणून (token म्हणून) एखादी क्षुल्लक चोरीची घटना घडवून दूर करण्याचा होता. यामुळे कुणालाही हानी पोहोचणार नव्हती. कुणाचीही दिशाभूल होणार नव्हती. चोरी केल्याबद्दल न्याय-यंत्रणा जी शिक्षा देईल, ती भोगायलाही आम्ही तयार होतो. याबाबतीत महात्मा गांधी व बाबासाहेब आंबेडकर यांची उदाहरणे देण्यासारखी आहेत. गांधी हे कायद्याचे तज्ज्ञ, नीतीने वागणारे. गांधींनी मिठाचा कायदा मोडणारा सत्याग्रह केला. त्यासाठी लाक्षणिक म्हणून (token) मूठभर मीठ उचलून बेकायदेशीर रीतीने मीठ गोळा करण्यास लोकांना सांगितले त्यावेळी गांधींचा मुख्य उद्देश लाक्षणिक कृती करून कायदा मोडणे किंवा लोकांना कायदा मोडायला सांगणे हा नव्हता; तर सरकारला मीठावरील कर मागे घेण्यास भाग पाडणे हा होता. आंबेडकरांनीही अस्पृश्यांना मंदिरे खुली व्हावीत म्हणून मंदिरप्रवेशाची चळवळ केली. आंबेडकरांचा मुख्य उद्देश अस्पृश्यांनीही देवाच्या भजनी लागावे, पूजा-अर्चात त्यांनी गुंतून पडावे, ब्राह्मणांच्या शोषणाला आणखी बळी पडावे हा नव्हता; तर अस्पृश्यांनाही इतरांप्रमाणे समान वागणूक मिळावी, अस्पृश्यता नष्ट व्हावी हा होता. जिथे कुत्र्या-मांजरांनाही मुक्त प्रवेश असतो, तिथे अस्पृश्यांना मात्र बंदी होती. मंदिर-प्रवेशाच्या निमित्ताने ब्राह्मणांच्या डोक्यात जरा प्रकाश पडेल व अस्पृश्यांनाही समान वागणूक मिळेल,

* 'मिथ' हा इंग्रजी शब्द येथे भ्रामकता, खोटेपणा, कपोलकल्पितता या अर्थाने वापरलेला दिसतो. – *संपादक*









असे आंबेडकरांना वाटले होते. अस्पृश्यांना देवाच्या भजनी लावणे हा चुकीचाच मार्ग होता. इष्ट साध्य होण्यासाठी जसे आंबेडकरांचे साधन (अस्पृश्यांना मंदिरप्रवेश – त्यांना देवाच्या भजनी लावणे) व गांधीचे साधन (कायदा मोडणे) लाक्षणिक होते; त्याचप्रमाणे समितीचा उद्देश लाक्षणिक स्वरूपात (token) चोरी करून शनि-शिंगणापुरचा भ्रम दूर करण्याचा होता. येथे दुसरी एक गोष्ट लक्षात घेण्यासारखी आहे. प्रत्यक्ष कृतीद्वारे, प्रयोगाद्वारे एखाद्या समजुतीचे प्रत्यंतर लोकांना दाखवले तर ते लगेच पटते. त्यासाठी वैचारिक पातळीवर वेगळा युक्तिवाद करण्याची गरज भासत नाही. विज्ञान, निर्भयता, नीती हे *अंनिस*चे ब्रीद आहे. त्यामुळे भीतीवर आधारलेल्या नीतीस अंतिमचा विरोध आहे. सत्य शोधण्यासाठी विज्ञान हे साधन घेऊन, निर्भयतेने कृती करून समोर आलेल्या सत्यावर आधारित जीवन जगणे *अंनिस*ला मान्य आहे. एखादी गोष्ट खोटी आहे हे प्रत्यक्ष प्रयोगाने (वैज्ञानिक पद्धतीने) दाखवणे हा तर समितीचा पाया आहे. भर बाजारातून जाणाऱ्या ट्रकमागे जशी स्कूटर भुर्रकन निघून जात असते, त्याचप्रमाणे मान्यवर विचारवंतांचे शेपूट धरून जाणारे काही छोटे तथाकथित विचारवंत असतात. अशा काही तथाकथित विचारवंतांना समितीची लाक्षणिक अर्थाने चोरी करून सत्य शोधण्याची भूमिका मान्य नाही. मुळात सत्य लपविणे हीच अनीती असते. त्यामुळे हे सत्य बाहेर काढण्यासाठी अनीतीचा आभास निर्माण केल्यास एवढी ओरड कशी काय होऊ शकते? तथाकथित पुरोगाम्यांना सत्य लपवून ठेवणे ही अनीती समजत नव्हती काय? सत्य शोधण्यासाठी वापरण्यात येत असलेले विज्ञान हे साधन नीतीएवढेच महत्त्वाचे आहे. कारण मानवाची आतापर्यंतची प्राप्ती विज्ञानाने झालेली आहे, केवळ नीतीने नव्हे. विज्ञान हे वस्तुनिष्ठ असते, तर नीती ही समाजनिष्ठ व समूहनिष्ठ असते. त्याचबरोबर निर्भयता या गुणालाही आम्ही विज्ञान व नीतीएवढेच महत्त्व देतो. त्यामुळे पळशीकर म्हणतात तशा कोणत्याही अनिष्ट साधनांचा आम्ही वापर केलेला नाही. यामध्ये कुठेही ठोकशाही नाही की धक्कातंत्र नाही. संघर्ष करणे म्हणजे धक्कातंत्र नव्हे.

पळशीकरांचा दुसरा मुद्दा असा : "लोकांमध्ये दीर्घकाळ रुजलेल्या श्रद्धा त्यांनी सत्य म्हणून स्वीकारल्या आहेत, तेव्हा त्यांच्याशी लढाई करताना कार्यकर्त्यांनी श्रद्धांचे निर्मूलन लोकांच्या हृदयांमधून व डोक्यांमधून करावयाचे आहे. यासाठी त्यांना वेगळी दृष्टी प्रदान करण्याची गरज आहे... अंधश्रद्धा बाळगणारे लोक आणि त्यांच्या अंधश्रद्धा व त्यावर आधारित व्यवहार यात भेद करावयास हवा. अंधश्रद्ध समूहांशी आत्मीयतेने, नम्रता बाळगून, आदरपूर्वक संवाद साधत अंधश्रद्धानिर्मूलन करावयास हवे."

समाजातील लोकांची मी तीन वर्गांत विभागणी करतो. समाजातील एक वर्ग केवळ तर्कशुद्ध युक्तिवादाने बदलणारा असतो. दुसऱ्या वर्गाला प्रत्यक्ष कृतीद्वारे सत्य सांगितल्यास अधिक चांगल्या तऱ्हेने पटते. तिसरा जो वर्ग आहे, तो या दोन्ही प्रक्रियांनी बदलत नाही. दीर्घकाळ रुजलेल्या रूढी-परंपरेचा पगडा ज्यांच्यावर नसतो, अशी कुमार वयातील मुले व तरुण लवकर बदलण्याची शक्यता असते. परंतु ज्यांच्या मनामध्ये रूढी-परंपरा दीर्घकाळ रुजलेल्या असतात असे लोक वयाने थोडे मोठे असतात. त्यांना बदलायला फार कष्ट घ्यावे लागतात. माणसाचा मेंदू नवीन गोष्टींना, बदलांना विरोध दर्शवितो. सामान्य माणसांनी आपल्या समजुती विना प्रश्न विचारता स्वीकारलेल्या असतात. आणि या समजुतींना तो घट्टपणे चिकटून असतो. मेंदूमध्ये व्यवस्थित रचलेल्या समजुतींना धक्का देणारी नवीन गोष्ट आढळल्यास तो अस्वस्थ होतो. पूर्वीच्या समजुतींपेक्षा नवीन वेगळ्या कल्पना जर सामावून घ्यायच्या असतील तर त्याच्या मनाच्या घडणीमध्ये पुनर्रचना करण्याची आवश्यकता असते. या कष्टदायक कृतीसाठी मेंदूची ऊर्जा खर्च करण्याची गरज असते. त्यामुळे या वर्गाचा नवीन मतांशी असहमत होण्याकडेच कल असतो. ह्या तिन्ही वर्गांची समाजामध्ये सरमिसळ असते. त्यामुळे व्याख्याने देताना, लेख-पुस्तके यातून विचार मांडताना किंवा प्रत्यक्ष कृतीद्वारे संवाद साधताना ह्या तिन्ही वर्गांना वेगवेगळे करून सांगता येत नाही. परंतु संवाद हा आत्मीयतेने व नम्रतेनेच केला जातो. परंतु जे लोक अंधश्रद्धेच्या नावाखाली लुबाडणूक, दिशाभूल व शोषण करतात, त्या ठिकाणी संघर्ष करावा लागतो; आव्हान द्यावे लागते. हा संघर्ष लोकशाही मार्गानेच केला जातो. व्याख्यानांद्वारे, शिबिरांद्वारे व अन्य माध्यमांद्वारे आत्मीयतेने साधलेला संवाद समोर न येता, संघर्ष व आव्हानाचीच बाजू ठळकपणे प्रसारमाध्यमांद्वारे पुढे आल्याने *अंनिस* लोकांशी आत्मीयतेने संवाद साधत नाही, असे पळशीकरांना वाटले असावे. जेथे संघर्ष व आव्हान होते, तेथे पळशीकरांना 'धक्का' वाटण्याचा संभव आहे. परंतु हा धक्का अपरिहार्य आहे.


अनुक्रमणिका

कारण संघर्ष व आव्हानातूनही माणसे बदलतात; जनजागृती होते. तिसऱ्या प्रकारचा वर्ग बदलत नसेलही. त्याचे आणखी एक कारण आहे. प्रत्येक वेळी प्रत्यक्ष प्रयोगांनी – कृतीने – वैज्ञानिक पद्धतीने सत्य गोष्टी उघड करून दाखवता येतातच असे नाही. उदा. अध्यात्म, धर्म, लग्नविधी, काही धार्मिक कर्मकांडे यांतील फोलपण सडेतोड युक्तिवादानेच उघड करावा लागतो. अंधश्रद्धांवर केलेली टीका अंधश्रद्धेच्या व्यवहारापासून वेगळी करता येत नाही व समाजात समजून घेण्याच्या दृष्टीने असलेले वेगवेगळे वर्ग या कारणांमुळे पळशीकर म्हणतात तसे अंधश्रद्धा, व्यवहार व लोक यांत भेद करता येत नाही.

पळशीकरांचा पुढचा मुद्दा आहे की, "बुद्धिप्रामाण्यवादी म्हणविणारे कार्यकर्ते धर्म नावाची गोष्ट मोडीत काढू इच्छिणारे, हिंदू धर्माविषयी अनादर, तुच्छभाव व खंडन करण्याची दृष्टी वाळगणारे आहेत." परंतु पुढे ते असेही म्हणतात की, "ही धारणा वरीचशी वस्तुनिष्ठ आहे असेच म्हणायला लागेल." बुद्धिप्रामाण्यवादी कार्यकर्त्यांची ही भूमिका योग्य की अयोग्य याबद्दल त्यांनी मौन पाळले आहे. अर्थातच वस्तुनिष्ठ भूमिका अयोग्य म्हटल्यास तो वदतोव्याघात होईल. ह्या गोष्टीतील वस्तुनिष्ठता जर त्यांना पटलेली असेल तर कार्यकर्त्यांबद्दल पळशीकरांच्या तोंडी कटुता का?

पळशीकरांनी पांडुरंगशास्त्री आठवले यांच्या 'स्वाध्याय' चळवळीने धर्माच्या चौकटीत लोकांना ठेवून त्यांच्या सश्रद्धा वाढवून घातक रूढी-प्रथांचे उच्चाटन केल्याचे म्हटले आहे. आठवले यांनी कोणत्या घातक रूढी-प्रथांचे उच्चाटन केले, याची यादी पळशीकरांनी दिली असती तर बरे झाले असते. त्रिकालसंध्या, पुनर्जन्म व मूर्तीपूजा यांवर विश्वास असणाऱ्या आठवले यांचे उदाहरण पळशीकर देतात याचेच आश्चर्य वाटते. जन्मजात वर्णव्यवस्थेचे समर्थन, वैदिक संस्कृती, भगवद्गीता, मनुस्मृती यांचा उदोउदो, रोटीबेटीबंदीचे समर्थन, तसेच स्त्रियांनी नोकरी करणे, घटस्फोट घेणे, पुनर्विवाह करणे या गोष्टींना कट्टर विरोध असे पांडुरंगशास्त्री आठवले यांचे विचार आहेत, की जे आता कोणताही common sense असलेला मनुष्य त्याचे समर्थम करण्यास धजावणार नाही. आठवले यांची व्यक्तिपूजा, लाखो रुपयांची उधळण करणारे समारंभ याही गोष्टींवर पळशीकरांनी आपली दृष्टी टाकावी. आजच्या सामाजिक-आर्थिक विषमता व शोषणाला व जातिभेदाला धक्का न लावता, त्यांना बळकटी देऊन केलेले संस्कार योग्य मानायचे का, याचा विचार पळशीकरांनी करावा.

"संघर्षात्मक कृतिकार्यक्रमातून जेव्हा खोट्या, लबाड व्यक्तींपेक्षा अंधश्रद्धांवर रोख असतो तेव्हा अंधश्रद्धांचे निर्मूलन जितके होते त्या तुलनेत सश्रद्ध भाविक माणसे कडवट व कट्टर बनतात. यामुळे समाजकारण-राजकारण करणाऱ्यांचे बळ आपण वाढवत नाही ना?" असा प्रश्न उपस्थित करून पळशीकरांनी *'अंनिस'*ला सल्ला दिला आहे. ज्यांच्या मनाला बदलायला अधिक कष्ट पडतात किंवा जो नवीन विचारांना आपल्या मनात सामावून घेत नाही, असा एक समाजातील तिसरा वर्ग (मागे सांगितल्याप्रमाणे) जास्त कडवट व कट्टर बनत असेलही. परंतु त्याच वेळेस काही तरुण व कुमार वयातील वर्ग या विचारांनी भारावूनही जातो. त्यांना हे विचार पटतात. म्हणूनच *'अंनिस'*मध्ये तरुणांची संख्या अधिक आहे. संघर्षात्मक कृतिशील कार्यक्रमांतून जरी समाजकारण-राजकारण करणाऱ्यांचे बळ काहीजणांत वाढत असले तरी, तरुणांमध्ये बुद्धिवादी विचारसरणी (rational thinking) व संशयवाद (skepticism) रुजवणे *'अंनिस'* महत्त्वाचे मानते. *'अंनिस'* अशा एका ऐतिहासिक मुक्तविचाराच्या व संशयवादाच्या परंपरेची (free thought and skepticism tradition) वारसदार आहे की ज्याचे मूळ चीनमधील कन्फ्युशिअस (इ.स. पूर्व ५५१ ते ४७९), भारतातील चार्वाक-लोकायत परंपरा, प्राचीन ग्रीस व रोममधील मुक्त विचार-परंपरा (पायऱ्हो, स्टोईक, इम्पीरीकस – इ.स. पूर्व ४ थे शतक ते इ.स. ३ रे शतक), युरोपमधील नवजीवनाची (Renaissance: १४५३ -१६९०) व प्रबोधनाची (Enlightenment: १६९०-१७८१) चळवळ ते आताचे विज्ञान व मानवतावाद यांमध्ये शोधता येते. युरोपमधील प्रबोधनाची चळवळ ही तर जगाला दिलेली देणगी आहे. आजच्या मानवाच्या बंधनमुक्त विचार-पद्धतीचा पाया प्रबोधनाच्या ह्या चळवळीत आहे. प्रबोधन काळात परंपरागत धर्म, धार्मिकश्रद्धा व धर्मसंस्था यांचे वर्चस्व झुगारून देण्यात आले. बुद्धीच्या विचारस्वातंत्र्याला सार्वभौम महत्त्व देण्यात आले. जर प्रबोधन जन्मास आले नसते तर आपण अजूनही चेटकिणींना व पाखंडी व्यक्तींना जाळत राहिलो असतो; मंत्रातंत्राच्या व जादूटोण्याच्या साहाय्याने बरे होण्याची आणि नशिबाने सुधारणा होण्याची आशा करीत राहिलो असतो. व्यक्तीने चांगले-वाईट, योग्य-अयोग्य, सत्य-असत्य यांचा स्वतंत्रपणे परंपरा, धर्म, धर्मगुरू, ईश्वर, परलोकाचे आकर्षण,

अनुक्रमणिका






नरकाची भीती, धर्मग्रंथ यांपैकी कशाचेही मनावर ओझे व दडपण न मानता मुक्त मनाने निर्णय केला पाहिजे, यावर प्रबोधनाचा मुख्य भर होता. '*अंनिस*'सुद्धा हाच वारसा पुढे चालवत आहे. '*अंनिस*' अस्तित्वात येण्यापूर्वी सर्वसामान्य लोकांची भूत-भानामती, मंत्रतंत्र, जादूटोणा, ज्योतिष एवढेच नव्हे तर धर्मश्रद्धा यावद्दलची मते व आजची त्यांची मते यात निश्चितच फरक पडलेला आढळेल. हा फरक '*अंनिस*'ने केलेल्या वैचारिक क्रांतीने घडून आलेला आहे. याची तुलना युरोपच्या प्रबोधनाच्या चळवळीबरोबर करावी लागेल. समाजकारण-राजकारण करणाऱ्यांचे वळ वाढते म्हणून विचार मांडायचे सोडून द्यायचे का? किंवा त्याची तीव्रता कमी करायची का? मुक्त व संशयवादी विचार मांडण्याचे धैर्य, विशेषतः प्रतिगामी व धर्मांध शक्ती वाढत असताना तर, अधिक दाखवायला हवे.

"महात्मा फुल्यांची सार्वजनिक सत्यधर्माची चळवळ त्यांच्या हयातीतच अपयशी ठरली. ते वारकरी चळवळीशी समरस झाले असते व उन्नत धर्मस्थापनेच्या वळणाने त्यांनी संवाद प्रस्थापित केला असता तर त्यांची चळवळ यशस्वी झाली असती," असे पळशीकरांनी पुढचा मुद्दा मांडताना म्हटले आहे. महात्मा फुल्यांना निर्भयपणे कृतिशील विचार मांडायचा होता. चळवळ यशस्वी होईल की अयशस्वी होईल याचे मोजमाप करायचे नव्हते. त्यावेळची दळणवळणाची अपुरी साधने, बहुजनसमाजातील कमालीची निरक्षरता व कमालीचे दारिद्र्य, प्रसार-माध्यमांचा अभाव यामुळे बहुसंख्य जनतेसमोर कमी वेळात पोचणे मुश्कील होते. फुले हे कृतिशील क्रांतिकारक व त्या काळाचा विचार करता बुद्धिप्रामाण्यवादीच होते. Rights of Man आणि Age of Reason ही क्रांतिकारी पुस्तके लिहिणाऱ्या थॉमस पेन यासारख्या विचारवंताचा त्यांच्यावर प्रभाव होता. त्यामुळे वारकरी चळवळीशी समरस होऊन लोकांचा चिकित्सक दृष्टिकोन मारायचा नव्हता व त्यांच्या अंधश्रद्धा वाढवायच्या नव्हत्या. फुल्यांना क्रांतिकारी विचार मांडून, त्याप्रमाणे कृती करून समाज बदलायचा होता.

"लोकांचा परंपरेने चालत आलेला धर्म गृहीत धरून, परंतु धर्माचा त्याग न करता गाडगेबावांनी श्रद्धा, रूढी, प्रथा यांवर कठोर प्रहार केले. त्यांच्या शिकवणुकीच्या प्रभावाखाली माणसे जास्त सुसंस्कृत व माणुसकीसंपन्न वनली. त्यांनी मोहिमा काढल्या नाहीत", इत्यादी उद्‌गार पळशीकरांनी काढले आहेत. गाडगेवावांनी धर्माच्या चौकटीत राहून विचार मांडले म्हणून '*अंनिस*'नेही तीच चौकट पाळावी, या म्हणण्यात काही अर्थ नाही. उलट ही चौकट ओलांडून '*अंनिस*'ने एक पाऊल पुढे टाकले आहे. युरोपच्या प्रबोधनाच्या चळवळीचा – मुक्त विचाराचा – बुद्धिप्रामाण्यवादी विचारसरणीचा वारसा समिती चालवत असल्यामुळे धर्मासारख्या जन्माने चिकटलेल्या अविवेकी गोष्टीची चौकट किंवा वंधन मानण्याचे काही कारण नाही. गाडगेवावांच्या शिकवणुकीच्या प्रभावाखाली जशी माणसे जास्त सुसंस्कृत व माणुसकीसंपन्न वनली, असे पळशीकर म्हणतात त्याप्रमाणे '*अंनिस*'च्या शिकवणुकीच्या प्रभावाखाली माणसे जास्त सुसंस्कृत व माणुसकीसंपन्न तर वनत आहेतच परंतु ती अधिक चिकित्सक (Skeptical) व आपापल्या वुद्धीने विचार करू लागली आहेत, असे आम्हास वाटते. मोहिमा काढून लोकजागृती करणे यात वाईट काय आहे हे मला समजत नाही. खरे तर गावोगावी कीर्तनाच्या माध्यमातून प्रबोधन करणाऱ्या गाडगेवावांच्या त्या एकखांवी मोहिमाच होत्या.

पळशीकरांनी धर्माच्या चौकटीत राहून, धर्माच्या उन्नत शिकवणुकीचा आधार घेऊन साने गुरुजींनी लोकांशी केलेल्या संवादाचा उल्लेख केला आहे. अस्पृश्यता पालन करणाऱ्या सर्वसामान्य सवर्ण माणसांशी ते जिव्हाळ्याने नम्रतापूर्वक संवाद करीत, असे पळशीकरांनी म्हटले आहे. साने गुरुजी ब्राह्मण होते, त्यामुळे सवर्ण माणसांनी आपल्या वरोवरीच्या असणाऱ्या साने गुरुजींवरोवर जिव्हाळ्याने नम्रतापूर्वक संवाद साधला असेल किंवा साने गुरुजींनीही सवर्णांशी संवाद साधला असेल, परंतु साने गुरुजी तर दलित असते तर असा सवर्णांशी संवाद साधला गेला असता का? आंवेडकरांनी सवर्णांशी असा संवाद साधायचा सुरुवातीला आटोकाट प्रयत्न केला. परंतु त्याचे फळ त्यांना काय मिळाले, तर अधिक मानहानी. याची असंख्य उदाहरणे वावासाहेवांच्या ग्रंथांत नमूद आहेत. म्हणूनच त्यांना सवर्णांविरुद्ध अधिक कठोर भूमिका घ्यावी लागली. Riddles in Hinduism सारखे पुस्तक लिहावे लागले. शेवटी आपल्या वांधवांसह धर्मदेखील वदलावा लागला.

सांगण्याचा मुद्दा हा की, समितीने केवळ धर्माची चौकट न मानता आणखी एक पाऊल पुढे टाकलेले आहे. हे पाऊल पाठीमागे खेचण्याचा कुणीही प्रयत्न करू नये.



# महापरिनिर्वाणसूत्र

मे.पुं. रेगे



**नमो तस्य भगवतो अरहतो सम्मासम्बुद्धस्स**

सम्यक संबोधी प्राप्त झालेल्या त्या भगवान अर्हताला नमन असो

## भाग तिसरा

३६. मग भगवंतांनी सकाळच्या समयी चीवर परिधान केले आणि चीवरात भिक्षापात्र घेऊन ते वैशालीत भिक्षेसाठी गेले. परतल्यावर त्यांच्यासाठी तयार केलेल्या आसनावर ते बसले आणि भोजन झाल्यानंतर ते आयुष्मान् आनंदाला म्हणाले, *'आनंदा, चटई घे. मी चापाल चैत्याला जाऊन तेथेच दिवस घालवीन."*

"भन्ते, जसे आपण म्हणता," असे म्हणून आयुष्मान् आनंदाने अनुमती दाखविली आणि चटई उचलून, भगवन्तांच्या मागून, त्यांच्या पावलांवर पाउल ठेवीत, तो निघाला. अशा रीतीने भगवंत चापाल चैत्याला निघाले. तेथे पोचल्यावर आपल्यासाठी पसरलेल्या चटईवर ते बसले. आनंदही त्यांना अभिवादन करून त्यांच्याजवळ बसला.

३७. आपल्याजवळ वसलेल्या त्या आयुष्मान आनंदाला भगवंत म्हणाले, *'आनंदा, वैशाली रमणीय आहे, उदेन चैत्य, गोतमक चैत्य, सत्तम्ब चैत्य, बहुपुत्त चैत्य, सारन्दद चैत्य, चापाल चैत्य हे (सारे) रमणीय आहेत.*

*"आनंदा ज्या कोणी इद्धी[१] प्राप्त करून देणाऱ्या चार मार्गांचे चिंतन केले आहे, त्यांचा विकास केला आहे, हे मार्ग अनुसरलेले आहेत, त्यांच्यावरून जाण्यात प्रगती साधली आहे, त्यांच्यावर जे आरूढ झाले आहेत, आपली (मानसिक) समुन्नती साधण्याचे साधन म्हणून आणि नैतिक उन्नयनाचे अधिष्ठान म्हणून ह्या मार्गावर ज्याने पकड मिळविली आहे असा माणूस, त्याची तशी इच्छा असली तर ह्याच जन्मी कल्पभर जगू शकतो किंवा कल्पाचा उरलेला काळ संपेपर्यंत जगू शकतो. आता तथागताने ह्या चार मार्गांचे चिंतन केले आहे, त्यांचा विकास केला आहे (आणि वर सांगितल्याप्रमाणे त्यांच्यावर परिपूर्ण पकड मिळविली आहे). तेव्हा त्याची इच्छा असल्यास तो कल्पभर किंवा कल्पाचा अवशिष्ट भाग संपेपर्यंत जगू शकतो."*

आता भगवंतांनी इतक्या स्पष्टपणे सूचन केले असतानाही, इतक्या स्वच्छपणे ध्वनित केले असताही आयुष्मान आनंद ते ओळखू शकला नाही. त्याने भगवंतांची अशी प्रार्थना केली नाही की, "भगवंतांनी ह्या लोकात कल्पभर स्थिरपणे राहावे; सुगताने, ह्या लोकात कल्पभर स्थिरपणे राहावे, बहुजनांच्या हितासाठी, बहुजनांच्या सुखासाठी, जगावर अनुकंपा करण्यापूर्वी देव-मनुष्यांच्या धारणेसाठी, हितासाठी, सुखासाठी भगवंतांनी







अनुक्रमणिका

कल्पभर ह्या लोकात राहावे." (आयुष्मान आनंद असे म्हणाला नाही कारण) माराने[२] त्याच्या अंतःकरणावर पगडा बसविला होता.

भगवंतांनी दुसऱ्यांदा आणि तिसऱ्यांदा असेच निवेदन केले पण आयुष्मान आनंदाच्या चित्तावर माराने असा काबू मिळविला होता की भगवंतांनी कल्पभर इहलोकात राहावे अशी याचना त्याने केली नाही.

मग भगवंतांनी आनंदाला उद्देशून म्हटले, *"आनंदा, आता काही काळ माझा निरोप घेऊन तुला इष्ट वाटेल ते करायला तू मोकळा आहेस."* "ठीक आहे, भन्ते" असे म्हणून आयुष्मान आनंदाने भगवन्तांना अनुमती दाखविली, आपल्या आसनावरून उठून त्याने भगवंतांना अभिवादन केले, त्यांना प्रदक्षिणा घालून, तेथून फार दूर नसलेल्या एका झाडाच्या बुंध्यापाशी तो बसला.

३८. आता आयुष्मान आनंद निघून गेल्यानंतर लवकरच पापात्मा मार भगवंतांजवळ आला आणि शेजारी उभा राहिला. आणि तसा उभा असताना भगवंतांना तो म्हणाला, "भगवंतांनी आताच परिनिर्वाणाप्रत जावे, सुगताने आता परिनिर्वाण करावे. भगवंतांचा परिनिर्वाणकाल आता आला आहे – भगवंतांनी जे शब्द उच्चारले होते त्यांना अनुसरून पहाताही त्यांचा परिनिर्वाणकाल आता आला आहे. भगवन्त म्हणाले होते, 'हे पापात्म्या! मी इतक्यात परिनिर्वाणाप्रत जाणार नाही. जोपर्यंत संघातील भिक्षू आणि भिक्षुणी, तसेच उपासक आणि उपासिका श्रावक (ज्यांनी धम्माचे चांगल्या प्रकारे श्रवण केले आहे असे) होणार नाहीत, शहाणे आणि विनीत होणार नाहीत, विशारद आणि बहुश्रुत होणार नाहीत, धम्मामध्ये प्रवीण होणार नाहीत, (धम्माला अनुसरून असलेली) मोठी आणि लहान कर्तव्ये पाळण्यात दक्ष होणार नाहीत, सन्मार्गाला अनुसरून सदैव वर्तन करणारे, धम्माने घालून दिलेल्या मार्गाने वाटचाल करणारे असे होणार नाहीत, जोपर्यंत स्वतः धम्माचे आकलन केल्यामुळे इतरांना धम्म शिकवू शकणारे, त्याचा उपदेश करू शकणारे, त्याचे ज्ञान इतरांना करून देऊ शकणारे, इतरांसाठी तो प्रस्थापित करू शकणारे, तो उघड करू शकणारे, त्याचे सूक्ष्मपणे विवरण करू शकणारे आणि तो स्वच्छपणे प्रकट करू शकणारे असे ते होणार नाहीत, जेव्हा इतर कुणी बाष्कळ सिद्धान्त मांडतो तेव्हा सत्याच्या बळावर त्याला पराभूत करून त्याचे खंडन करू शकतील आणि अद्भुत परिणाम घडवून आणणाऱ्या सत्याचा प्रसार करू शकतील असे ते जोपर्यंत होणार नाहीत तोपर्यंत मी परिनिर्वाणाप्रत जाणार नाही.

"भन्ते, संघातील भिक्षू आणि भिक्षुणी, तसेच उपासक आणि उपासिका आता अशा झाल्या आहेत, हे सर्व त्या करू शकतात. तेव्हा भन्ते, भगवंतांनी आता परिनिर्वाणाप्रत जावे; सुगताने परिनिर्वाणाप्रत जावे. भगवंतांचा परिनिर्वाणकाल आता आला आहे. भगवंतांनीच उच्चारलेल्या शब्दांप्रमाणे तो आला आहे. भगवंत म्हणाले होते, 'हे पापात्म्या, जोपर्यंत माझा हा शुद्ध धर्म (ब्रह्मचरीय[३]) यशस्वी होत नाही, त्याची अभिवृद्धी होत नाही, तो देवमनुष्यांत (व्यापक प्रमाणावर) प्रकाशित होत नाही तोपर्यंत मी परिनिर्वाणाप्रत जाणार नाही.' भन्ते, आपले ब्रह्मचरीय आता ह्या सर्व अवस्थेला पोचले आहे. भन्ते, भगवंतांनी आता परिनिर्वाणाला जावे; सुगताने आता परिनिर्वाणाला जावे. भगवंतांचा परिनिर्वाणकाल आता आला आहे."

जेव्हा पापात्मा मार असे बोलला तेव्हा भगवंत त्याला उद्देशून असे म्हणाले, *"हे पापात्म्या, तू आता सुखी हो. तथागताचे आता लवकरच परिनिर्वाण होईल. आतापासून तीन महिन्यांनी तथागताचे परिनिर्वाण होईल."*

३९. अशा रीतीने चापाल चैत्य येथे असताना भगवंतांनी जाणीवपूर्वक, बुद्ध्या, आपल्या उरलेल्या आयुष्याचा त्याग केला. आपल्या उरलेल्या आयुष्याचा त्यांनी असा त्याग केल्यानंतर प्रचंड, भीषण धरणीकंप झाला आणि देवदुंदुभींचा* मोठा ध्वनी झाला. आणि भगवंतांनी हे सर्व पाहिल्यानंतर एक श्लोक उद्गारला:

*आपल्या आयुष्याचा मुनीने त्याग केला*
*आयुष्याच्या असीम वा सीमित मूलकारणाचा;*
*आंतरिक आनंदाने आणि समाधानाने*
*कवच फोडून टाकावे तसे आपल्या जीवनाचे*
*कारण त्याने फोडून टाकले.*

४०. मग आयुष्मान आनंदाच्या मनात असा विचार आला. 'हा प्रचंड धरणीकंप, भीषण आणि रोमहर्षक असा हा धरणीकंप व्हावा हे किती आश्चर्यकारक, किती अद्भुत आहे; आणि देवांच्या दुंदुभींचाही ध्वनी झाला. ह्या धरणीकंपाचे

* बुद्धाला संबोधी प्राप्त झाली किंवा त्याने धर्मचक्रप्रवर्तन केले किंवा त्याचे परिनिर्वाण झाले (मुक्ती झाली) तेव्हा देव उत्सव करतात. पण ह्या देवांपेक्षा अर्हत् श्रेष्ठ असतो.



अनुक्रमणिका

आता घडलेले आणि पूर्वी घडलेले काय कारण असेल?'

मग आयुष्मान आनंद भगवंत ज्या ठिकाणी होते तेथे गेला. तेथे जाऊन त्यांना अभिवादन करून एका बाजूला बसला आणि म्हणाला, "भन्ते, हा प्रचंड धरणीकंप व्हावा, हा भीषण आणि रोमहर्षक धरणीकंप व्हावा, देवदुंदुभींचा ध्वनी यावा हे आश्चर्यकारक आणि अद्‌भुत आहे. ह्याचे नजिकचे आणि दूरचे कारण काय असावे?"

४१. *"आनंदा, महान धरणीकंप घडण्याची आठ नजिकची कारणे असतात आणि दूरची आठ कारणे असतात. ही आठ कोणती? आनंदा, ही महान पृथ्वी जलावर आधारलेली आहे आणि हे जल वायूवर आधारलेले आहे आणि वायू आकाशावर (अवकाशावर) आधारलेला आहे. आणि ज्या वेळी, आनंदा, प्रचंड झंझावात वहात असतात, महान वारे वहात असताना उदक कंपायमान होते त्यावेळी उदक कंपायमान झाल्यावर पृथ्वी थरकापते. प्रचंड धरणीकंप घडण्याची ही नजिकची व दूरची अशी प्रथम कारणे आहेत.*

*"तसेच, आनंदा, जेव्हा एखादा श्रमण किंवा ब्राह्मण, महान (बौद्धिक) सामर्थ्याचा, ज्याने आपल्या मनोविकारांवर काबू मिळविला आहे असा श्रमण किंवा ब्राह्मण, किंवा प्रचंड शक्तिमान आणि बलशाली देव, पृथ्वीच्या सान्त अशा संकल्पनेचे किंवा उदकाच्या अनंत अशा संकल्पनेचे ध्यान करतो (आणि वस्तूंचे तौलनिक मूल्य काय आहे ह्याचे ज्ञान प्राप्त करून घेतो) तेव्हा तो पृथ्वीला हालवितो, कम्पायमान करतो, तिला थरकापवितो. प्रचंड धरणीकंप घडून येण्याची ही नजिकची आणि दूरची अशी दुसरी कारणे आहेत.*

*"तसेच, आनंदा, जेव्हा एखादा बोधिसत्त्व आपली तात्पुरती असलेली सुखमय काया जाणीवपूर्वक, बुद्‌ध्या सोडून आपल्या आईच्या उदरात अवतरतो तेव्हा ही पृथ्वी थरथरते, कम्पित होते, थरकापू लागते. प्रचंड धरणीकंप घडण्याची, नजिकची व दूरची, अशी ही तिसरी कारणे आहेत.*

*"तसेच, आनंदा, जेव्हा बोधिसत्त्व जाणीवपूर्वक, बुद्‌ध्या आपल्या मातेच्या गर्भाशयातून बाहेर पडतो तेव्हा ही पृथ्वी थरथरते, कम्पित होते, थरकापते. प्रचंड धरणीकंप घडण्याचे हे चवथे, नजिकचे व दूरचे कारण आहे.*

*"तसेच, आनंदा, जेव्हा तथागत सर्वश्रेष्ठ अशी सम्यक् संबोधी प्राप्त करून घेतो तेव्हा ही पृथ्वी हलते, कम्पित होते, थरकापू लागते. प्रचंड धरणीकंप घडण्याचे हे पाचवे, नजिकचे व दूरचे असे कारण आहे.*

*"तसेच, आनंदा, जेव्हा तथागत श्रेष्ठ अशा धर्मचक्राचे प्रवर्तन करतो तेव्हा ही पृथ्वी हलते, कम्पित होते, थरकापू लागते. प्रचंड धरणीकंप होण्याचे हे सहावे, नजिकचे व दूरचे कारण आहे.*

*"तसेच, आनंदा, जेव्हा तथागत जाणीवपूर्वक, बुद्‌ध्या आपल्या शेष आयुष्याचा त्याग करतो तेव्हा ही पृथ्वी हलते, कम्पित होते आणि थरकापू लागते. प्रचंड धरणीकंप होण्याचे हे सातवे, नजिकचे व दूरचे, कारण आहे.*

*"तसेच, आनंदा, जेव्हा तथागत परिनिर्वाणाप्रत जातो, अशा परिनिर्वाणाप्रत की ज्याच्यात अस्तित्वाचे निःशेषपणे विसर्जन झालेले असते, (मागे काहीच उरत नाही), तेव्हा ही पृथ्वी हलते, कंपित होते, थरकापते. प्रचंड धरणीकंप होण्याचे हे आठवे, नजिकचे व दूरचे असे कारण आहे.*

*"प्रचंड धरणीकंप होण्याची, आनंदा, ही आठ नजिकची आणि दूरची कारणे आहेत."*

४२. *"आता, आनंदा, अशा आठ परिषदा आहेत.*[४] *कोणत्या आठ? क्षत्रियांची परिषद, ब्राह्मणांची परिषद, गृहपतींची परिषद, श्रमणांची परिषद, लोकपाल असलेल्या चार देवांच्या गणांची परिषद, तेहत्तिस देवांची परिषद, माराच्या गणांची परिषद आणि ब्रह्माच्या गणांची परिषद. माझ्या मनात असे येते, आनंदा, शेकडो क्षत्रियांच्या परिषदेत जेव्हा मी प्रवेश करीत असे तेव्हा आसनावर बसण्यापूर्वी किंवा त्यांच्याशी बोलण्यापूर्वी किंवा त्यांच्याशी संभाषण सुरू करण्यापूर्वी माझा वर्ण त्यांच्या वर्णासारखा होत असे आणि माझा आवाज त्यांच्या आवाजासारखा होत असे. मग धम्मविषयक प्रवचन देऊन मी त्यांना उपदेश करीत असे, त्यांना उत्तेजित करीत असे, त्यांना प्रेरित करीत असे, उल्हसित करीत असे. पण मी बोलत असताना ते मला ओळखीत नसत. ते म्हणत, 'हा जो असे बोलला तो कोण असेल? हा माणूस असेल की देव असेल?' त्यांना धम्मविषयक प्रवचनाने उपदेश करून, उत्तेजित करून, प्रेरित करून, उल्हसित करून मी अंतर्धान पावत असे. पण मी अंतर्धान पावल्यावरही ते मला ओळखीत नसत. ते म्हणत, 'हा जो अंतर्धान पावला तो कोण असेल? माणूस असेल की देव असेल?'*

(मग भगवंतांनी ह्याच शब्दांत ह्या आठ परिषदांतील इतर परिषदांत ते कसा प्रवेश करीत आणि त्यांचे बोलणे होई

किंवा ते अंतर्धान पावत तेव्हा त्यांना कुणी कसा ओळखीत नसे हे सांगितले.)

*"आता, आनंदा अशा ह्या आठ परिषदा आहेत."*

४३. *"आता, आनंदा, बाह्य पदार्थ टिकून राहतात ह्या भासामुळे जो भ्रम निर्माण होतो त्याच्यावर तावा (आधिपत्य) प्राप्त करून घेण्याची आठ स्थाने आहेत. ही कोणती आठ स्थाने?*

*"जेव्हा रूपाची संकल्पना ज्याच्या मनात आहे असा माणूस सान्त (परिमित) आणि दृष्टीला सुखद किंवा दुःखद अशी बाह्य रूपे पाहतो आणि त्यांच्यावर ताबा मिळवितो (त्यांनी विचलित होत नाही) आणि आपल्याला त्यांचे ज्ञान होत आहे, दर्शन होत आहे ही जाणीव त्याला असते तेव्हा तो आधिपत्याच्या पहिल्या स्थानावर आरूढ असतो.*

*"जेव्हा रूपाची संकल्पना ज्याच्या मनात आहे असा माणूस अनंत (अपरिमित) आणि दृष्टीला सुखद किंवा दुःखद अशी बाह्य रूपे पाहतो, त्यांच्यावर ताबा मिळवितो आणि आपल्याला ज्ञान होत आहे आणि दर्शन होत आहे ही जाणीव त्याला असते तेव्हा तो आधिपत्याच्या दुसऱ्या स्थानावर असतो.*

*"जेव्हा रूपाची संकल्पना ज्याच्या मनात नाही असा माणूस सान्त आणि दृष्टीला सुखद किंवा दुःखद अशी बाह्य रूपे पाहतो, त्यांच्यावर ताबा मिळवितो, आणि आपल्याला ज्ञान होत आहे, दर्शन होत आहे. ही जाणीव त्याला असते तेव्हा तो आधिपत्याच्या तिसऱ्या स्थानावर असतो.*

*"जेव्हा रूपाची संकल्पना ज्याच्या मनात नाही असा माणूस अनंत आणि दृष्टीला सुखद किंवा दुःखद अशी बाह्य रूपे पाहतो, त्यांच्यावर ताबा मिळवितो आणि आपल्याला ज्ञान होत आहे, दर्शन होत आहे ही जाणीव त्याला असते तेव्हा तो आधिपत्याच्या चवथ्या स्थानावर असतो.*

*"जेव्हा रूपाची संकल्पना ज्याच्या मनात नसते असा माणूस रंगाने नील असलेली, नील भासणारी, नील म्हणून प्रतिबिंबित होणारी बाह्य रूपे पाहतो – जसे उम्मापुष्प (जवसाचे फूल) रंगाने निळे असते, निळे भासते, निळे म्हणून प्रतिबिंबित होते किंवा वाराणशी येथे विणलेले तलम वस्त्र जसे कुठच्याही बाजूने पाहिले तरी वर्णाने निळे असते, निळे भासते, निळे म्हणून प्रतिबिंबित होते – तसेच रूपाची संकल्पना ज्याच्या मनात नसते असा माणूस, अशाच रीतीने जेव्हा वर्णाने निळे असणारे, निळे भासणारे, निळे म्हणून प्रतिबिंबित होणारे बाह्य रूप पाहतो, त्याच्यावर ताबा मिळवतो, आणि आपल्याला ज्ञान होत आहे, दर्शन होत आहे ही जाणीव त्याला असते तेव्हा तो आधिपत्याच्या पाचव्या स्थानावर असतो.*

(आधिपत्याचे सहावे, सातवे आणि आठवे स्थान यांचे स्पष्टीकरण नेमक्या ह्याच शब्दांत ह्यानंतर करण्यात आले आहे. फक्त निळ्या रंगाऐवजी पिवळा, तांबडा आणि शुभ्र हे वर्ण घेतात आणि उम्मा पुष्पाची जागा कर्णिकार, बनधुजीवक ही फुले आणि पहाटेचा शुक्र तारा हे घेतात.)

*"ही आनंदा आधिपत्याची आठ स्थाने होत....."*

४४. *"आणि, आनंदा, मुक्तीच्या" (बाह्य रूपांकडून प्राप्त होणाऱ्या संवेदना आणि कल्पना ह्यांच्यामुळे निर्माण होणाऱ्या अडचणींपासून साधावयाच्या मुक्तीच्या) आठ पायऱ्या आहेत. कोणत्या आठ?*

*"रूपाच्या कल्पनेने ज्याचे मन भरून गेले आहे तो रूपे पाहतो. ही मुक्तीची पहिली पायरी.*

*"रूपाची कल्पना मनात नसतानाही तो बाह्य रूप पहातो. ही मुक्तीची दुसरी पायरी.*

*"हे शुभच आहे ह्या विचाराने (त्याला जे दिसत असते त्याच्यावर) तो एकचित्त होतो. ही मुक्तीची तिसरी पायरी.*

*"रूपाच्या समग्र संकल्पनेच्या पूर्णतया पलीकडे जाऊन, त्याला विरोध करण्याच्या कल्पनेला पूर्णपणे संपुष्टात आणून, त्याचा (कशाशी तरी) भेद आहे ह्या कल्पनेकडे पूर्णपणे दुर्लक्ष करून, 'हे सर्व अनंत आकाश आहे' असा विचार करून, माणूस जेव्हा अशा मनाच्या अवस्थेला पोचतो की, तिच्यात आकाशाचे अनंतत्व ही एकच संकल्पना अस्तित्वात असते आणि जेव्हा तो ह्या मानसिक अवस्थेत स्थिर होतो तेव्हा ती मुक्तीची चवथी पायरी असते.*

*" 'आकाश हे अनंत असे अधिष्ठान आहे' ह्या समग्र कल्पनेच्या पूर्णतया पलीकडे जाऊन, 'हे सर्व अनंत विज्ञान आहे' असा विचार करून जेव्हा तो अशा मानसिक अवस्थेला पोचतो की त्याच्या मनात विज्ञानाचे अनंतत्व ही एकच कल्पना अस्तित्वात असते आणि ह्या मानसिक अवस्थेत जेव्हा तो स्थिर राहतो, तेव्हा ती मुक्तीची पाचवी पायरी असते.*

*"विज्ञानाच्या अनंतत्वाच्या समग्र कल्पनेच्या पूर्णतया पलीकडे जाऊन 'काहीच अस्तित्वात नाही' असा विचार करून जेव्हा तो अशा मानसिक अवस्थेला पोचतो की तिच्यात त्याच्या मनापुढे कोणताही विषय विशेषेकरून उपस्थित असत*







अनुक्रमणिका

नाही आणि ह्या अवस्थेत जेव्हा तो स्थिर राहतो तेव्हा ती मुक्तीची सहावी पायरी असते.

"अनस्तित्वाच्या समग्र कल्पनेच्या पूर्णतया पलीकडे जाऊन जेव्हा तो अशा मानसिक अवस्थेला पोचतो की कल्पनांचे अस्तित्व आणि कल्पनांचा अभाव यांतील काहीही विशेषेकरून त्याच्या मनापुढे उपस्थित नसते आणि जेव्हा ह्या अवस्थेत तो स्थिर राहतो, तेव्हा ती मुक्तीची सातवी पायरी असते.

"जेव्हा 'कल्पनांचे अस्तित्वही नाही आणि अभावही नाही' ह्या मानसिक अवस्थेच्या पूर्णपणे पलीकडे जाऊन तो अशा अवस्थेला पोचतो की तिच्यात संवेदना आणि कल्पना लोप पावलेल्या असतात, तेव्हा ती मुक्तीची आठवी पायरी असते.

"आनंदा, मुक्तीच्या अशा आठ पायऱ्या आहेत."

४५. "एका प्रसंगी, आनंदा, मी उरुवेला येथे नेरञ्जरा नदीच्या तीरावर मेंढपाळांच्या एका वडाच्या झाडाखाली विश्रांती घेत होतो. मला नुकतीच सम्यक् संबोधी प्राप्त झाली होती. तेव्हा पापात्मा मार, आनंदा, मी जेथे होतो तेथे आला आणि माझ्याजवळ उभा राहून ह्या शब्दांत तो मला म्हणाला, 'भन्ते, भगवंतांनी आताच परिनिर्वाणाप्रत जावे. सुगताने परिनिर्वाण करावे. भगवंतांचा परिनिर्वाणकाल आता आला आहे.' असे घडल्यावर त्या पापात्म्या माराला मी म्हटले, 'हे पापात्म्या, मी इतक्यात परिनिर्वाणाप्रत जाणार नाही. जोपर्यंत संघातील भिक्षू आणि भिक्षुणी, तसेच उपासक व उपासिका श्रावक (ज्यांनी धम्माचे चांगल्या प्रकारे श्रवण केले आहे असे) होणार नाहीत, शहाणे आणि विनीत होणार नाहीत, विशारद आणि बहुश्रुत होणार नाहीत, धम्मामध्ये प्रवीण होणार नाहीत, (धम्माला अनुसरून असलेली) मोठी आणि लहान कर्तव्ये पाळण्यात दक्ष होणार नाहीत, सन्मार्गाला अनुसरून सदैव वर्तन करणारे, धम्माने घालून दिलेल्या मार्गाने वाटचाल करणारे असे होणार नाहीत, जोपर्यंत स्वतः धम्माचे आकलन केल्यामुळे इतरांना धम्म शिकवू शकणारे, त्याचा उपदेश करू शकणारे, त्याचे ज्ञान इतरांना करून देऊ शकणारे, त्याचे सूक्ष्मपणे विवरण करू शकणारे आणि तो स्वच्छपणे प्रकट करू शकणारे असे ते होणार नाहीत, जेव्हा इतर कुणी बाष्कळ सिद्धान्त मांडतो तेव्हा सत्याच्या बळावर त्याला पराभूत करून त्याचे खंडन करू शकतील आणि अद्‌भुत परिणाम घडवून आणणाऱ्या सत्याचा प्रसार करू शकतील असे ते होणार नाहीत – (जो पर्यंत हे सर्व होणार नाही) तोपर्यंत मी परिनिर्वाणाप्रत जाणार नाही. जोपर्यंत माझा हा शुद्ध धर्म (ब्रह्मचरीय) यशस्वी होत नाही, त्याची अभिवृद्धी होत नाही, देव-मनुष्यांत व्यापक प्रमाणावर तो प्रकाशित होत नाही तोपर्यंत मी परिनिर्वाणप्रत जाणार नाही.' "

४६. "आणि, आनंदा, आज पुन्हा चापाल चैत्यात मी होतो त्या ठिकाणी पापात्मा मार आला आणि मला उद्देशून त्याने हेच शब्द उच्चारले.

४७. "आणि, आनंदा, त्याने असे म्हटल्यानंतर त्याला उत्तर देताना मी म्हटले, 'हे पापात्म्या, तू आता सुखी हो. तथागताचे लवकरच परिनिर्वाण होईल. आजपासून तीन महिन्यांनी तथागत परिनिर्वाणाप्रत जाईल.'

"अशा रीतीने, आनंदा, तथागताने आज चापाल चैत्यात जाणीवपूर्वक आणि बुद्ध्या आपल्या शेष आयुष्याचा त्याग केला आहे."

४८. ह्यानंतर आयुष्मान आनंद भगवंतांना म्हणाला, "भगवंतांनी ह्या लोकात कल्पभर स्थिरपणे राहावे, सुगताने ह्या लोकात कल्पभर स्थिरपणे राहावे, बहुजनांच्या हितासाठी आणि बहुजनांच्या सुखासाठी, ह्या जगावर अनुकम्पा करण्यासाठी म्हणून, देवमनुष्यांचे हित व्हावे, कल्याण व्हावे, त्यांचा लाभ व्हावा म्हणून (तथागताने स्थिरपणे ह्या लोकात कल्पभर राहावे.)"

"आनंदा, आता पुरे. तथागतापाशी याचना करू नको. तथागताची (अशी) याचना करण्याची वेळ निघून गेली आहे."

(आणि दुसऱ्यांदा आणि तिसऱ्यांदा आनंदाने त्याच शब्दांत तथागताची याचना केली आणि तथागताने तेच प्रत्युत्तर त्याला दिले.)

"तथागताच्या बोधीवर (प्रज्ञानावर), आनंदा, तुझी श्रद्धा आहे का?"

"होय, भन्ते."

"मग, आनंदा, तथागताला, तीन वेळा विचारून तू त्रास का देतोस?"

"भन्ते, भगवंतांच्याच मुखातून मी ऐकले आहे, भगवंतांच्याच मुखातून मला हे समजले आहे की 'ज्या कुणी इद्धी प्राप्त करून देणाऱ्या चार मार्गांचे चिंतन केले आहे, त्यांचा विकास केला आहे, हे मार्ग अनुसरलेले आहेत, त्यांच्यावरून जाण्यात प्रगती साधली आहे, ह्या मार्गांवर जो आरूढ झाला आहे, आपली मानसिक समुन्नती साधण्याचे साधन म्हणून आणि नैतिक उन्नयनाचे अधिष्ठान म्हणून त्यांच्यावर ज्याने पकड मिळविली आहे, असा माणूस, त्याची इच्छा असली तर


अनुक्रमणिका

त्याच जन्मी कल्पभर जगू शकतो किंवा कल्पाचा अवशिष्ट भाग संपेपर्यंत जगू शकतो. आता तथागतांनी ह्या मार्गांचे चिंतन केले आहे (आणि वर वर्णन केल्याप्रमाणे) त्यांचे अनुसरण केले आहे. त्यांची इच्छा असल्यास ते कल्पभर जगू शकतात किंवा कल्पाचा अवशिष्ट भाग संपेपर्यंत जगू शकतात.' "

*"आनंदा, तुझी श्रद्धा आहे का?"*

"होय, भन्ते"

*"मग, आनंदा, तुझाच हा दोष आहे, तुझाच हा अपराध आहे, की तथागताने तुझ्याकडे इतक्या स्पष्टपणे सूचित केले असता, इतक्या स्वच्छपणे ध्वनित केले असतानाही तू ते उमजू शकला नाहीस आणि तथागताकडे अशी याचना केली नाहीस की 'भगवंतांनी कल्पभर ह्या लोकात राहावे. बहुजनांच्या हितासाठी आणि सुखासाठी, ह्या जगावर अनुकम्पा करण्यासाठी, देवमनुष्यांच्या कल्याणासाठी, लाभासाठी, हितासाठी भगवंतांनी येथे कल्पभर राहावे.' तथागताची अशी याचना तू केली असतीस तर तथागताने (कदाचित्) दुसऱ्या खेपेलाही तुझी प्रार्थना अमान्य केली असती पण तिसऱ्या खेपेला ती स्वीकारलीही असती. तेव्हा, आनंदा, हा तुझाच दोष आहे, तुझाच अपराध आहे."*

४९. *"एकदा, आनंदा, मी राजगृह येथे गृध्रकूट पर्वतावर राहात होतो. तेथे, आनंदा, मी तुला असे म्हटले, 'हे राजगृह किती रमणीय आहे, हा गृध्रकूट किती रमणीय आहे! आनंदा, ज्या कुणी इद्धी प्राप्त करून देणाऱ्या चार मार्गांचे चिंतन केले आहे, त्यांचा विकास केला आहे, हे मार्ग अनुसरलेले आहेत, त्यांच्यावरून वाटचाल करण्यात प्रगती साधली आहे, आपली मानसिक समुन्नती साधण्याचे साधन म्हणून आणि आपल्या नैतिक उन्नयनाचे अधिष्ठान म्हणून ह्या मार्गांवर जो आरूढ झाला आहे, त्यांच्यावर ज्याने पकड मिळविली आहे, असा माणूस, त्याची इच्छा असली तर, ह्याच जन्मी कल्पभर जगू शकतो किंवा कल्पाचा अवशिष्ट भाग संपेपर्यंत जगू शकतो. पण तथागताने असे सूचन तुला स्पष्टपणे केले असताना, असे स्वच्छपणे ध्वनित केले असताना त्याचे आकलन करायला तू असमर्थ ठरलास आणि तथागताची तू अशी याचना केली नाहीस की, 'भगवंतांनी कल्पभर ह्या लोकी राहावे. बहुजनांच्या हितासाठी आणि सुखासाठी, ह्या जगावर अनुकम्पा करण्यासाठी, देवमनुष्यांच्या कल्याणासाठी, लाभासाठी, हितासाठी भगवंतांनी येथे कल्पभर राहावे.' तथागताने तुझी प्रार्थना दुसऱ्या खेपेलासुद्धा अमान्य केली असती पण तिसऱ्या खेपेला त्याने ती मान्य केली असती. तेव्हा हा तुझाच दोष आहे, आनंदा, हा तुझाच अपराध आहे."*

५०. *"एके प्रसंगी, आनंदा, मी त्याच राजगृहात वटवृक्षांच्या राईत, – एके प्रसंगी त्याच राजगृहात दरोडेखोरांच्या कड्यावर, – एके प्रसंगी त्याच राजगृहात वेभार पर्वताच्या उतारावरील सत्तपण्णि गुहेत – एके प्रसंगी त्याच राजगृहात इसिगिली डोंगरावरील काळ्या खडकावर – एके प्रसंगी त्याच राजगृहात सप्पसोंडिक डोंगरावरील सितवनातील गुहेत – एके प्रसंगी त्याच राजगृहात तपोद वनात – एके प्रसंगी त्याच राजगृहात खारींना चरण्यासाठी असलेल्या वेळूवनात – एके प्रसंगी त्याच राजगृहात जीवकाच्या आंबराईत – एके प्रसंगी त्याच राजगृहात मद्दकुच्छीच्या मृगवनात मी रहात होतो.*

*"आता, आनंदा, तेथेसुद्धा मी तुला म्हटले, 'आनंदा, हे राजगृह किती रमणीय आहे, हे गृध्रकूट किती रमणीय आहे, गोतमाचा हा वटवृक्ष किती रमणीय आहे, दरोडेखोरांचा हा कडा किती रमणीय आहे, वेभार पर्वताच्या उतारावर असलेली ही सत्तपण्णि गुहा किती रमणीय आहे, इसिगिली पर्वताच्या उतारावर असलेला हा काळा खडक किती रमणीय आहे, सप्पसोंडिक डोंगरावरील सितवनातील ही गुहा किती रमणीय आहे, हे तपोद वन किती रमणीय आहे, वेळूवनातील खारी जेथे भक्षण करतात ते हे स्थान, जीवकाची ही आंबराई, मद्दकुच्छीचे हे उपवन किती रमणीय आहे!*

*" 'आनंदा, ज्या कुणी इद्धी प्राप्त करून देणाऱ्या चार मार्गांचे चिंतन केले आहे, त्यांचा विकास केला आहे, हे मार्ग अनुसरलेले आहेत, त्यांच्यावरून वाटचाल करण्यात प्रगती साधली आहे, आपली मानसिक समुन्नती साधण्याचे साधन म्हणून आणि आपल्या नैतिक उन्नयनाचे अधिष्ठान म्हणून ह्या मार्गांवर जो आरूढ झाला आहे, त्यांच्यावर ज्याने पकड मिळविली आहे असा माणूस, त्याची इच्छा असली तर, ह्याच जन्मी कल्पभर जगू शकतो किंवा कल्पाचा अवशिष्ट भाग जगू शकतो. आता तथागताने ह्या मार्गांचे चिंतन केले आहे आणि (वर सांगितलेल्या समग्र पद्धतीनुसार) त्यांचे अनुसरण केले आहे. आणि त्याची इच्छा असली तर तो कल्पभर किंवा कल्पाचा अवशिष्ट भाग संपेपर्यंत जगू शकतो.' "*

५१. "आनंदा, एके प्रसंगी मी येथेच वैशालीला उदेन चैत्यात राहात होतो. त्या वेळीही, आनंदा, तुला उद्देशून मी






म्हटले, 'आनंदा, किती रमणीय आहे वैशाली, किती रमणीय आहे उदेन चैत्य! ज्या कुणी, आनंदा, इद्धी प्राप्त करून देणाऱ्या चार मार्गांचे मनन केले असेल, त्यांचा विकास केला असेल, हे मार्ग अनुसरले असतील, त्यांच्यावरून वाटचाल करण्यात प्रगती साधलेली असेल, आपली मानसिक समुन्नती साधण्याचे साधन म्हणून आणि आपल्या नैतिक उन्नयनाचे अधिष्ठान म्हणून ह्या मार्गांवर जो आरूढ झाला असेल – अशा माणसाची जर इच्छा असेल तर तो कल्पभर किंवा कल्पाचा अवशिष्ट भाग संपेपर्यंत जगू शकतो. तथागताने ह्या चार मार्गांचे मनन केले आहे आणि (वर सांगितलेल्या समग्र पद्धतीनुसार) त्यांचे अनुसरण केले आहे. त्याची इच्छा असेल तर तो कल्पभर किंवा कल्पाचा अवशिष्ट काल संपेपर्यंत जगू शकतो.' "

५२. *"एके प्रसंगी, आनंदा, मी येथे वैशालीला गोतमक चैत्यात – एके प्रसंगी येथे वैशालीला सत्तम्ब चैत्यात, – एके प्रसंगी येथे वैशालीला बहुपुत्त चैत्यात – एके प्रसंगी येथे वैशालीला सारन्दद चैत्यात मी रहात होतो (आणि प्रत्येक प्रसंगी, आनंदा, ह्याच शब्दांत मी तुझ्याशी बोललो).*

*"आणि आज, आनंदा, चापाल चैत्यात मी तुझ्याशी बोललो आणि तुला म्हटले, 'वैशाली किती रमणीय आहे, उदेन चैत्य किती रमणीय आहे; गोतमक चैत्य किती रमणीय आहे; सत्तम्ब चैत्य किती रमणीय आहे; बहुपुत्त चैत्य किती रमणीय आहे, सारन्दद चैत्य किती रमणीय आहे. ज्या कुणी इद्धी प्राप्त करून देणाऱ्या चार मार्गांचे चिंतन केले आहे, त्यांचा विकास केला आहे, हे मार्ग अनुसरलेले आहेत, त्यांच्यावरून जाण्यात प्रगती साधली आहे, ह्या मार्गांवर जो आरूढ झाला आहे, आपली मानसिक समुन्नती साधण्याचे साधन म्हणून आणि नैतिक उन्नयनाचे अधिष्ठान म्हणून त्यांच्यावर ज्याने पकड मिळविली आहे असा माणूस, त्याची इच्छा असली तर त्याच जन्मी कल्पभर जगू शकतो किंवा कल्पाचा अवशिष्ट भाग जगू शकतो. आता तथागतांनी ह्या मार्गांचे चिंतन केले आहे (आणि वर वर्णन केल्याप्रमाणे) त्यांचे अनुसरण केले आहे. त्यांची इच्छा असल्यास ते कल्पभर जगू शकतात किंवा कल्पाचा अवशिष्ट भाग जगू शकतात.' "*

५३. *पण, आनंदा, मी तुला पूर्वीच सांगितलेले नाही का की आपल्याला जवळच्या आणि प्रिय असणाऱ्या सर्व वस्तूंचा स्वभावच असा असतो की आपल्याला त्यांच्यापासून फारकत घ्यावी लागते, त्यांना सोडून जावे लागते, त्यांच्याशी असलेले अनुबंध तोडावे लागतात. मग हे कसे शक्य आहे, आनंदा, जर जे काही जन्माला येते, ज्या कशाला अस्तित्व देण्यात येते आणि संघटित करण्यात येते, त्याच्यात त्याच्या अस्तित्वाच्या विसर्जनाची अनिवार्यता अंतर्हित असते, असे असेल तर हे कसे शक्य आहे की अशा एखाद्या वस्तूचे विसर्जनच होणार नाही? अशी स्थिती असूच शकणार नाही! ह्या मर्त्य अस्तित्वाचा, आनंदा, तथागताने त्याग केला आहे, ते बाजूला सारले आहे, त्याचा अव्हेर केला आहे, ते सोडून दिले आहे, आपल्या उरलेल्या आयुष्याचा त्याने परित्याग केला आहे. तथागताने हे शब्द आता उच्चारले आहेत : 'लवकरच तथागताचे परिनिर्वाण होईल. आतापासून तीन महिन्यांच्या शेवटी तथागत परिनिर्वाणाप्रत जाईल.' अधिक काळ जगावे म्हणून तथागताला हे शब्द उच्चारल्याचा पश्चात्ताप होईल असे घडणार नाही."*

५४. *"चल, आनंदा, आपण महावनात कूटागारशालेत जाऊ."*

"आपण म्हणता तसे" असे म्हणून आयुष्मान आनंदाने आपली संमती दर्शविली.

मग भगवंत आयुष्मान आनंदासोबत महावनातील कूटागारशालेत गेले. तेथे पोचल्यावर ते आयुष्मान आनंदाला म्हणाले, *"आनंदा, आता जा आणि वैशालीच्या जवळपास राहाणाऱ्या सर्व भिक्षूंना उपट्ठानशालेत जमव"*

"भन्ते, जशी आपली इच्छा." असे म्हणून आनंदाने भगवंतांना आपली अनुमती दर्शविली. मग वैशालीच्या जवळपास राहणाऱ्या सर्व भिक्षूंना उपट्ठानशालेत जमविल्यावर तो भगवंतांकडे गेला, त्यांना त्याने अभिवादन केले आणि त्यांच्याजवळ उभा राहिला आणि त्यांच्याजवळ उभा राहून त्याने भगवंतांना म्हटले, "भन्ते, उपट्ठानशालेत भिक्षुसंघ जमला आहे. भगवंतांनी आपल्याला योग्य वाटेल ते करावे."

५५. मग भगवंत उपट्ठानशालेत गेले. तेथे गेल्यावर आपल्यासाठी मांडलेल्या आसनावर ते बसले. तेथे बसल्यावर भिक्षूंना उद्देशून ते म्हणाले,

*"भिक्षूंनो, ज्या धम्मांचे (सत्यांचे) ज्ञान मला झाले त्यांचा उपदेश मी तुम्हाला जो केला तो यास्तव केला की तुम्ही त्यांच्यात विशारद व्हावे, त्यांचे आचरण करावे, त्यांचे मनन करावे आणि त्यांचा प्रसार करावा; ह्यासाठी की मग हा शुद्ध*

*धर्म (ब्रह्मचरीय), बहुजनांच्या हितासाठी आणि सुखासाठी, जगावर अनुकम्पा करण्यासाठी, देवमनुष्यांचा लाभ व्हावा, कल्याण व्हावे, सुस्थिती असावी म्हणून चिरकाल टिकेल आणि नांदत राहील.*

*"भिक्षूंनो, मग ही कोणती सत्ये (धम्म) आहेत की ज्यांचे ज्ञान मला झाले व ज्यांचा उपदेश मी तुम्हाला केला — अशी सत्ये की तुम्ही त्यात पारंगत झाला की त्यांचे आचरण करणे, मनन करणे, त्यांचा प्रसार करणे हे तुम्हाला विहित ठरते? (हे सर्व ह्यासाठी करायचे की मग) बहुजनांच्या हितासाठी, बहुजनांच्या सुखासाठी, ह्या जगावर अनुकम्पा व्हावी म्हणून, देवमनुष्यांचा लाभ व्हावा, कल्याण व्हावे, सुस्थिती असावी म्हणून हा शुद्ध धर्म (ब्रह्मचरीय) चिरकाल टिकेल आणि नांदत राहील.*

*"ही सत्ये (धम्म) अशी आहेत :*

***चार सतिपट्ठान (स्मृत्युपस्थान)** – मनाच्या जागरूकपणाचे चार प्रकार*

***चार सम्मप्पधान (सम्यक्-प्रहान)** – चार सम्यक् प्रयत्न*

***चार इद्धिपाद***

***पाच इंद्रिये***

***पाच सामर्थ्ये***

***सात बोधीची अंगे***

***अष्टांगिक आर्य मार्ग**[६]*

*"भिक्षूहो, ज्यांचे मला दर्शन झाल्यावर ज्यांचा मी तुम्हाला उपदेश केला ती ही सत्ये आहेत. त्यांचे यथार्थ ज्ञान तुम्हाला झाल्यावर त्यांचे आचरण करणे, त्यांचे मनन करणे आणि त्यांचा प्रसार करणे हे तुम्हाला साजेसे आहे. कारण त्यामुळे हा शुद्ध धर्म, बहुजनांच्या हितासाठी, बहुजनांच्या सुखासाठी, जगावर अनुकम्पा व्हावी म्हणून, देवमनुष्यांचा लाभ व्हावा, कल्याण व्हावे, त्यांची सुस्थिती असावी म्हणून चिरकाल टिकेल व नांदत राहील."*

५६. मग भगवंतांनी भिक्षूंना उद्देशून असे आवाहन केले की, *"पहा, भिक्षूंनो, सर्व सङ्खार (संस्कार, अनेक घटक एकत्रित होऊन बनलेल्या वस्तू) वृद्ध (जर्जर) होतात. हा त्यांचा धर्मच आहे. तेव्हा तुम्ही प्रयत्नपूर्वक, काळजीपूर्वक आपले श्रेय (बोधनिर्वाण) संपादन करा. लवकरच तथागताचे परिनिर्वाण होईल. आतापासून तीन महिन्यांनी तथागत निर्वाणाप्रत जाईल.*

*"माझे वय आता परिपक्व झाले आहे,*
*माझ्या जीवनाचा अंत आला आहे*
*मी तुम्हाला सोडून जात आहे,*
*मी आता केवळ*
*माझ्यावर विसंबून आहे*
*प्रयत्नशील, जागरूक असे तुम्ही असा, भिक्षूंनो,*
*सुशील असा*
*तुमच्या निर्धारात तुम्ही स्थिर असा,*
*आपल्या चित्तावर दक्षतेने पहारा करा*
*जो श्रांत होत नाही आणि ह्या सत्याला*
*आणि विनयाला (साधनेला) दृढपणे कवटाळतो*
*तो हा संसारसागर तरून जातो;*
*तो दुःखाचा अंत करतो."*

## भाग चौथा

५७. मग भगवंतांनी सकाळी लवकर चीवर परिधान केले आणि भिक्षापात्र घेऊन भिक्षेसाठी त्यांनी वैशालीत प्रवेश केला आणि वैशालीत भिक्षेसाठी फिरल्यानंतर आणि भोजन आटोपल्यानंतर ते भिक्षाटनाहून परतत असताना त्यांनी एखादा हत्ती ज्याप्रमाणे (पूर्णपणे) मागे वळून पाहतो त्याप्रमाणे वैशालीकडे पाहिले आणि आयुष्मान आनंदाला उद्देशून ते म्हणाले, *"आनंदा, तथागताने वैशालीनगर पाहण्याची ही अखेरची वेळ आहे. आनंदा, चल आपण भण्डगामाला जाऊ."*

"जशी आपली इच्छा, भन्ते," असे म्हणून आनंदाने भगवंतांना आपली अनुमती दर्शविली.

५८. मग भगवंत भिक्षूंच्या मोठ्या समुदायाबरोबर भण्डगामला गेले आणि ते गावातच राहिले.

तेथे भगवंत भिक्षूंना उद्देशून म्हणाले, *"भिक्षूंनो, चार सत्ये न समजल्यामुळे, त्यांचे नीट आकलन न झाल्यामुळे आपल्याला, तुम्हाला आणि मला, इतका दीर्घकाळ धावाधाव करावी लागते, संसाराच्या (जन्ममरणाच्या फेऱ्याच्या) ह्या श्रांत मार्गावरून भटकावे लागते. ही कोणती चार सत्ये (धम्म)? आर्य (श्रेष्ठ) शीलाचे, आर्य समाधीचे, आर्य प्रज्ञेचे आणि आर्य विमुक्तीचे नीट आकलन होते तेव्हा अस्तित्वाची (आपले स्वतःचे विशिष्ट अस्तित्व चालू राहावे ह्याची) तृष्णा उच्छिन्न होते, नव्याने अस्तित्व प्राप्त व्हावे ही तृष्णा नष्ट होते आणि मग पुनर्जन्म असत नाही."* भगवान असे म्हणाले. आणि हे म्हणून झाल्यावर सुगत पुढे म्हणाले,

अनुक्रमणिका

*"शील, समाधी, प्रज्ञा आणि श्रेष्ठ विमुक्ती*
*पुण्यश्लोक गोतमाने हे धम्म अंतर्बाह्य जाणले.*
*त्यांचे ज्ञान झाल्यावर त्याने भिक्षूंना त्यांचा*
*उपदेश केला*
*दिव्य चक्षू धारण करणारा, दुःखाचा नाश करणारा*
*हा गुरू परिनिर्वाणाला जात आहे."*

५९. भण्डगाम येथे राहात असताना भगवंतांनी भिक्षूंना धर्माविषयी विस्ताराने प्रवचन दिले – शीलाचे स्वरूप असे आहे, समाधीचे स्वरूप असे आहे, प्रज्ञेचे स्वरूप असे आहे; शीलाने समृद्ध झालेल्या समाधीपासून मोठे फळ मिळते, मोठा लाभ होतो, समाधीने समृद्ध झालेल्या प्रज्ञेपासून मोठे फळ मिळते, मोठा लाभ होतो, प्रज्ञेने समृद्ध झालेले चित्त कामासव, भवासव आणि अविद्यासव ह्या आसवांपासून मुक्त होते.

भण्डगाम येथे भगवंतांना जितके दिवस राहायचे होते तितके राहिल्यानंतर भगवंत आनंदाला म्हणाले, *"चल, आनंदा, आपण हत्थिगाम येथे जाऊ या."* 'जशी आपली इच्छा, भन्ते,' आनंद म्हणाला. मग भगवन्त, भिक्षूंच्या मोठ्या समुदायासोबत हत्थिगाम येथे गेले.

[आणि ह्यानंतर भगवन्त अम्बगाम, जम्बुगाम आणि भोगनगर येथे गेल्याचे अशाच शब्दांत वर्णन येते.]

६०. भोगनगर येथे भगवन्त आनंद चैत्य येथे राहिले. तेथे भगवन्त भिक्षूंना उद्देशून म्हणाले, *"मी तुम्हाला चार महान धर्मप्रमाणांचा उपदेश करतो. तुम्ही तो लक्षपूर्वक ऐकावा. मी आता बोलतो."* "जशी आपली इच्छा" असे म्हणून भिक्षूंनी भगवंतांना अनुमती दर्शविली. भगवान म्हणाले,

*"भिक्षूंनो, पहिली गोष्ट अशी की एखादा भिक्षू असे म्हणेल की, 'मित्रांनो, भगवन्तांच्या स्वतःच्या मुखातून हे मी ऐकले आहे, त्यांच्या स्वतःच्या मुखातून मी हे ग्रहण केले आहे. हा धम्म (सत्य) आहे. हा विनय (साधनेचा नियम) आहे.' भिक्षूंनो, त्या भिक्षूच्या ह्या शब्दांचे स्तुती करून स्वागत करू नका किंवा त्यांचा तिरस्कार करू नका. स्तुती न करता किंवा तिरस्कार न करता त्यांतील प्रत्येक शब्द, प्रत्येक पद काळजीपूर्वक समजून घ्या आणि सुत्त (पिटकाशी) आणि विनय (पिटकाशी) ते ताडून पहा. अशा रीतीने ते (शब्द) ताडून पाहिले असता जर सुत्ताशी सुसंगत नसतील, विनयाशी जुळणारे नसतील, तर तुम्ही असा निष्कर्ष काढावा: 'पहा, हे भगवंतांचे वचन नाही, ह्या भिक्षूने (भगवन्ताच्या वचनाचे) नीट ग्रहण केलेले नाही.' आणि म्हणून, भिक्षूंनो, तुम्ही त्या वचनाचा अव्हेर करावा. पण त्याचे म्हणणे जर सुत्ताशी सुसंगत असले, विनयाशी जुळणारे असले तर मग तुम्ही ह्या निष्कर्षाला यावे की, 'पहा, हे भगवंतांचे वचन आहे, आणि ह्या भिक्षूने त्याचे नीट ग्रहण केले आहे.' भिक्षूंनो, अशा रीतीने तुम्ही हे धम्मविषयक पहिले महाप्रमाण म्हणून स्वीकारावे.*

*"तसेच, भिक्षूंनो, एखादा भिक्षू असे म्हणेल, 'अमूक एका निवासस्थानात भिक्षूंचा एक संघ, आपले स्थविर आणि नायक यांच्यासोबत राहतो. ह्या संघाच्या मुखातून मी हे ऐकले आहे, त्यांच्याजवळून मी हे ग्रहण केले आहे. (तेव्हा) हा धम्म आहे, हा विनय आहे, हा गुरूने दिलेला आदेश आहे.' त्या भिक्षूच्या ह्या म्हणण्याची प्रशंसा करून त्याचा स्वीकार करू नका किंवा त्याचा तिरस्कार करू नका. प्रशस्ती न करता किंवा तिरस्कार न करता त्याच्या म्हणण्यातील प्रत्येक शब्दाचे व पदाचे नीट आकलन करा. आणि त्याची सुत्ताशी तुलना करा आणि विनयाशी ते ताडून पहा. आणि अशी तुलना केली असता ते जर सुत्ताशी सुसंगत नाही आणि विनयाशी जुळत नाही असे आढळले तर तुम्ही या निष्कर्षाला या की 'पहा, हे भगवंताचे वचन नाही. ह्या भिक्षुसंघाने त्याचे यथार्थ ग्रहण केलेले नाही.' तेव्हा भिक्षूंनो तुम्ही त्या वचनाचा अव्हेर करावा. पण जर ते सुत्ताशी सुसंगत असेल आणि विनयाशी जुळत असेल तर मग तुम्ही या निष्कर्षाला या की, 'पहा हे भगवंतांचे वचन आहे आणि ह्या भिक्षुसंघाने त्याचे नीट ग्रहण केले आहे.' भिक्षूंनो अशा रीतीने तुम्हा हे धम्मविषयक दुसरे महाप्रमाण म्हणून स्वीकारावे.*

*"तसेच भिक्षूंनो एखादा भिक्षू म्हणेल, 'अमूक एका निवासस्थानात संघाचे अनेक स्थवीर रहात आहेत, ते बहुश्रुत आहेत, परंपरेने चालत आलेल्या श्रद्धेचे ते पालन करतात, धम्मामध्ये, विनयामध्ये आणि त्यांचे सार मांडणाऱ्या ग्रंथांमध्ये ते प्रवीण आहेत. ह्या स्थवीरांच्या तोंडून हे मी ऐकले आहे, त्यांच्या तोंडून हे मी ग्रहण केले आहे. हा धम्म आहे, हा विनय आहे, ही गुरूची शिकवण आहे.' त्या भिक्षूच्या ह्या म्हणण्याची प्रशंसा करून त्याचा स्वीकार करू नका किंवा त्याचा तिरस्कार करू नका. प्रशंसा न करता किंवा तिरस्कार न करता त्याच्या म्हणण्यातील प्रत्येक शब्दाचे व पदाचे नीट आकलन करा. आणि त्याची सुत्ताशी तुलना करा व विनयाशी ते ताडून पहा. आणि अशी तुलना केली असता ते जर सुत्ताशी सुसंगत नाही*

*आणि विनयाशी जुळत नाही असे आढळले तर तुम्ही या निष्कर्षाला या की हे भगवंतांचे वचन नाही ह्या स्थविरांनी त्याचे नीट आकलन केलेले नाही.' तेव्हा, भिक्षूंनो, तुम्ही त्याचा अव्हेर करा. पण ते जर सुत्ताशी सुसंगत असेल आणि विनयाशी जुळत असेल तर तुम्ही ह्या निष्कर्षाला यावे की 'पहा! ह्या स्थविरांनी त्याचे चांगले आकलन केले आहे.' भिक्षूंनो धम्माचे हे तिसरे महाप्रमाण म्हणून तुम्ही स्वीकारावे.*

*"तसेच, भिक्षूंनो, एखादा भिक्षू म्हणेल, 'अमूक एका निवासात एक भिक्षू राहात आहे, तो बहुश्रुत आहे, परंपरेने आलेल्या श्रद्धेचा तो स्वीकार करतो, धम्मात, विनयात, आणि धम्म व विनय ह्यांच्या साराचे संकलन करणाऱ्या ग्रंथांत तो प्रवीण आहे. त्याच्या मुखातून मी हे ऐकले आहे, त्याच्या मुखातून मी हे ग्रहण केले आहे. हा धम्म आहे, हा विनय आहे, ही गुरूची शिकवण आहे.' त्या भिक्षूच्या म्हणण्याची, भिक्षूंनो, तुम्ही प्रशंसा करून त्याचे म्हणणे ग्रहण करू नका किंवा त्याचा तिरस्कार करू नका. प्रशंसा न करता किंवा तिरस्कार न करता त्याच्या प्रत्येक शब्दाचे आणि पदाचे नीट आकलन करा आणि मग त्याची सुत्ताशी तुलना करा आणि ते विनयाशी ताडून पहा. अशी तुलना केल्यावर जर ते सुत्ताशी सुसंगत नसेल किंवा विनयाशी जुळत नसेल तर तुम्ही या निष्कर्षाला या की 'पहा, हे भगवंतांचे वचन नाही. ह्याचे त्या भिक्षूने गैर आकलन केले आहे.' तेव्हा, भिक्षूंनो, तुम्ही त्याचा अव्हेर करा. पण ते जर सुत्ताशी सुसंगत असेल आणि विनयाशी जुळत असेल तर मग तुम्ही या निष्कर्षाला या की, 'हे भगवन्तांचे वचन आहे. आणि ह्या स्थविराने त्याचे चांगले ग्रहण केले आहे.' धम्माचे हे चवथे महाप्रमाण म्हणून तुम्ही स्वीकारावे.*

*"भिक्षूंनो, धम्माची अशी चार महाप्रमाणे आहेत."*

६१. भगवंतांनी तेथेही भिक्षूंना उद्देशून, शील म्हणजे काय, समाधी म्हणजे काय, प्रज्ञा म्हणजे काय हे सांगणारे विस्तृत धर्मविषयक प्रवचन केले : शीलाने समृद्ध झालेल्या समाधीपासून महान फल मिळते, महान लाभ होतो, समाधीने समृद्ध झालेल्या प्रज्ञेपासून महान फल मिळते, महान लाभ होतो, प्रज्ञेने समृद्ध झालेले चित्त कामासव, भवासव, अविद्यासव ह्या मोठ्या दुष्प्रवृत्तीपासून मुक्त होते.

६२. आपली इच्छा असेपर्यंत भोगनगरात राहिल्यानंतर भगवान आयुष्मान आनंदाला म्हणाले, *'आनंदा, चल आपण पावा येथे जाऊ."*

"भन्ते, जशी आपली इच्छा," असे आयुष्मान आनंद म्हणाला. मग भगवंत भिक्षूंच्या मोठ्या समुदायाबरोबर पावा येथे जायला निघाले. तेथे भगवंत चुंद या धातूकाम करणाऱ्या कारागिराच्या आंवराईत राहिले.

मग धातुकाम करणाऱ्या त्या चुंदाच्या कानी आले की, भगवंत पावा येथे आले आहेत आणि आपल्याच आंबराईत उतरले आहेत.

मग धातुकाम करणारा तो चुंद भगवन्त जेथे होते तेथे गेला आणि त्यांना अभिवादन करून आदराने त्यांच्याजवळ बसला. तो तसा बसला असताना भगवंतांनी त्याला धर्मविषयक प्रवचन करून उपदेश केला, जागृत केले, उत्तेजित केले आणि उल्हसित केले.

भगवंतांनी केलेल्या धर्मोपदेशाने जागृत, उत्तेजित आणि उल्हसित झालेला, धातुकाम करणारा तो चुंद भगवंतांना म्हणाला, "भन्ते, भगवंतांनी भिक्षुसंघाबरोबर उद्या माझ्या घरी भोजन करण्याला मान्यता देऊन माझा सन्मान करावा." भगवंतांनी मूक राहून आपली संमती दाखविली. मग धातुकाम करणारा तो चुंद भगवंतांनी मान्यता दिली आहे हे जाणून आपल्या आसनावरून उठला, त्याने भगवंतांना प्रणाम केला आणि त्यांना प्रदक्षिणा घालून तो तेथून निघाला.

मग धातुकाम करणाऱ्या त्या चुंदाने पहाटे आपल्या निवासस्थानी गोड भात आणि पोळ्या आणि रानडुकराच्या वाळलेल्या मांसापासून एक पदार्थ असा स्वयंपाक तयार केला आणि त्याने भगवंतांना भोजनाची वेळ झाली आहे असे सांगितले, "भन्ते, भोजनाची वेळ झाली आहे; सर्व सिद्ध आहे."

मग भगवंतांनी सकाळी लवकर चीवर परिधान केले, आणि भिक्षापात्र घेऊन भिक्षुसमुदायाबरोबर ते, धातुकाम करणाऱ्या चुंदाच्या घरी गेले. तेथे गेल्यावर आपल्यासाठी मांडलेल्या आसनावर ते बसले. तेथे बसल्यावर धातुकाम करणाऱ्या चुंदाला ते म्हणाले, *"रानडुकराच्या वाळलेल्या मांसाचा जो पदार्थ तू बनविला आहेस तो मला वाढ. आणि गोड भात आणि पोळ्या हे जे इतर अन्न आहे ते भिक्षूंना वाढ."* "भन्ते, जशी आपली इच्छा," असे धातुकाम करणाऱ्या चुंदाने म्हणून आपली अनुमती दर्शविली. आणि डुकराच्या वाळलेल्या मांसाचा जो पदार्थ त्याने बनविला होता तो त्याने भगवंतांना वाढला आणि गोड भात आणि चपात्या हे इतर अन्न त्याने भिक्षुसंघाला



अनुक्रमणिका

वाढले.

मग भगवंत धातुकाम करणाऱ्या चुंदाला उद्देशून म्हणाले, *"डुकराच्या वाळलेल्या मांसाचा पदार्थ जेवढा शिल्लक असेल तो सर्व तू एका खड्ड्यात गाडून टाक. चुंदा, एक तथागत सोडले तर मला असा कुणी दिसत नाही – पृथ्वीवर किंवा माराच्या स्वर्गात, ब्रह्माच्या स्वर्गात, श्रमणांत किंवा ब्राह्मणांत, देवांत किंवा मनुष्यांत मला असा कुणी दिसत नाही – की त्याने जर हा पदार्थ खाल्ला तर तो तो पचवू शकेल."*

"भन्ते, जसे आपण म्हणता," असे धातुकाम करणारा चुंद म्हणाला आणि भगवंतांना त्याने अनुमती दर्शविली. आणि रानडुकराच्या वाळलेल्या मांसापासून बनविलेला पदार्थ जेवढा उरला होता तेवढा त्याने एका खड्ड्यात पुरून टाकला.

मग भगवंत ज्या ठिकाणी होते तेथे तो गेला, आणि तेथे आल्यावर तो आदराने त्यांच्या बाजूला बसला. तेथे तो बसल्यावर भगवंतांनी धर्मविषयक प्रवचन करून धातुकाम करणाऱ्या चुंदाला उपदेश केला, जागृत केले, उत्तेजित केले व उल्हसित केले. मग भगवंत आसनावरून उठले आणि तेथून निघाले.

६३. आता, धातुकाम करणाऱ्या चुंदाने शिजविलेले अन्न जेव्हा भगवंतांनी खाल्ले तेव्हा त्यांना अतिसाराची भयानक व्याधी जडली आणि तीक्ष्ण, मरणान्तिक वेदनांनी ते पीडले गेले. पण जागरूक आणि अविचल असलेल्या भगवंतांनी तक्रार न करता ती पीडा शांतपणे सहन केली.

मग भगवंत आयुष्यमान आनंदाला उद्देशून म्हणाले, *"चल, आनंदा, आपण कुसिनारा येथे जाऊ."* 'भन्ते, आपण म्हणता तसे," असे म्हणून आयुष्मान आनंदाने भगवंतांना अनुमती दर्शविली.

धातुकर्मी चुंदाने शिजविलेल्या अन्नाचे सेवन
जेव्हा त्यांनी केले तेव्हा, मी असे ऐकले आहे,
धीराने त्यांनी वेदना सहन केल्या,
तीक्ष्ण, मरणान्तिक म्हणाव्या अशा वेदना.
डुकराच्या वाळलेल्या मांसाचे सेवन केल्याक्षणीच
गुरूला भीषण व्याधीने पछाडले
मग विरेचन झाल्यावर भगवंतांनी सांगितले
*"मी आता कुसिनारा नगराला जाणार आहे."*

६४. मग मळलेली वाट सोडून भगवंत एका वृक्षाच्या बुंध्याशी गेले. तेथे गेल्यावर ते आयुष्मान आनंदाला म्हणाले, *"आनंदा, माझे ऐक. ह्या चीवराची घडी कर आणि ते माझ्यासाठी पसर. आनंदा मी थकलो आहे, मी थोडावेळ विश्रांती घेतो."*

भगवंत जेव्हा असे म्हणाले तेव्हा आयुष्मान आनंद त्यांना म्हणाला, "ठीक आहे भन्ते," आणि त्याने चीवराची चौपदरी घडी करून ते जमिनीवर पसरले. भगवंत आपल्यासाठी तयार केलेल्या आसनावर बसले. मग ते आयुष्मान आनंदाला म्हणाले, *"आनंदा, मला थोडे पाणी आणून दे बरे. मला तहान लागली आहे. आनंदा, मला पाणी प्यायचे आहे."* ते असे म्हणाले तेव्हा आयुष्मान आनंद भगवंतांना म्हणाला, "भन्ते, आताच पाचशे गाड्या इथून पलीकडे गेल्या आहेत. चाकांनी डचमळलेले पाणी उथळ झाले आहे. त्याचा प्रवाह अस्वच्छ, गढूळ झाला आहे. भन्ते, ककुत्था नदी येथून दूर नाही. तिचे पाणी स्वच्छ आणि रुचकर, थंड आणि पारदर्शक आहे. तिच्यात उतरणे सोपे आहे आणि ती रमणीय आहे. तेथे भगवंत पाणी पिऊ शकतील आणि गात्रे थंड करू शकतील."

पण भगवंत दुसऱ्यांदा आयुष्मान आनंदाला उद्देशून म्हणाले, *"आनंदा, मला थोडे पाणी आणून दे बरे. मला तहान लागली आहे. आनंदा, मला पाणी प्यायचे आहे."*

आणि आयुष्मान आनंद दुसऱ्यांदा भगवंतांना म्हणाला, "भन्ते, पण आताच येथून पाचशे गाड्या पलीकडे गेल्या आहेत. चाकांनी डचमळलेले पाणी उथळ झाले आहे. त्याचा प्रवाह अस्वच्छ, गढून झाला आहे. ककुत्था नदी येथून दूर नाही. तिचे पाणी स्वच्छ व रुचकर आहे, थंड आणि पारदर्शक आहे. ह्या नदीत उतरणे सोपे आहे आणि ती रमणीय आहे. भगवंत तेथे पाणी पिऊ शकतील आणि गात्रे थंड करू शकतील."

भगवंतांनी तिसऱ्यांदा आयुष्मान आनंदाला उद्देशून म्हटले, *"आनंदा, मला थोडे पाणी आण बरे. मला तहान लागली आहे. आनंदा, मला पाणी प्यायचे आहे."*

"भन्ते, आपण म्हणता तसे," असे म्हणून आनंदाने भगवंतांना अनुमती दर्शविली आणि तो जलपात्र घेऊन त्या ओढ्याकडे उतरला. आणि पहा! गाड्यांच्या चाकांनी खळबळलेला तो ओढा आताआतापर्यंत उथळ झाला होता आणि दूषित आणि गढूळ होऊन वहात होता तो आता, आयुष्मान आनंद तेथे आल्यावर, स्वच्छ, चमकदार आणि विशुद्ध अशा पाण्याने वाहू लागला.

आणि मग आनंदाच्या मनात विचार आला, 'तथागताची शक्ती, त्याच्या सामर्थ्याचा प्रभाव किती आश्चर्यकारक, किती अद्‌भुत आहे. कारण हा ओढा, चाकांनी खळबळून टाकला

असताना अगदी आताच उथळ झाला होता, त्याचा प्रवाह दूषित आणि गढूळ झाला होता. पण आता मी येथे आल्यावर त्याचा प्रवाह स्वच्छ, चमकदार आणि विशुद्ध झाला आहे.' आणि जलपात्रात पाणी घेऊन तो भगवंतांकडे परतला आणि भगवंत जेथे होते तेथे आल्यावर तो त्यांना म्हणाला, "भन्ते, तथागताचे थोर सामर्थ्य, त्याचा महान प्रभाव किती आश्चर्य-कारक, किती अद्‌भुत आहे. भन्ते, आताच हा ओढा चाकांनी खळबळलेला, उथळ झाला होता, आणि त्याचा प्रवाह दूषित आणि गढूळ झाला होता. पण मी तेथे गेल्यावर तो स्वच्छ, चमकदार आणि विशुद्ध असा वाहू लागला आहे. भगवंतांनी हे पाणी प्यावे, सुगताने हे पाणी प्यावे."

मग भगवंत ते पाणी प्यायले.

६५. आता त्यावेळी मल्ल जमातीतील (मल्लपुत्र असलेला) पुक्कुस नावाचा माणूस राजमार्गाने कुसिनाराहून पावा येथे चालला होता. आळार कालाम याचा तो अनुयायी होता.

आता मल्लपुत्र पुक्कुसाने भगवंतांना झाडाखाली बसलेले पाहिले. त्यांना पाहून भगवंत जेथे होते तेथे तो गेला, आणि तेथे गेल्यावर त्याने भगवंतांना अभिवादन केले आणि भगवंतांजवळ एका बाजूला आदराने बसला. आणि तेथे बसल्यावर मल्लपुत्र पुक्कुसाने भगवंतांना उद्देशून म्हटले, "भन्ते, ज्यांनी प्रव्रज्या घेतली आहे त्यांनी अशा शांतपणे विहार करावा हे किती आश्चर्यकारक, किती अद्‌भुत आहे.

"भन्ते, मागे एकदा आळार कालाम राजमार्गाने चालले होते. आणि मग रस्ता सोडून दिवसाच्या उकाड्यापासून विश्रांती घेण्यासाठी ते एका झाडाखाली बसले. आळार कालाम येथे बसले होते त्याच्या जवळूनच, भन्ते, पाचशे गाड्या एकामागून एक गेल्या. एक माणूस गाड्यांच्या त्या रांगेच्या जवळूनच मागून चालला होता, तो आळार कालाम जेथे होते तेथे गेला आणि तेथे गेल्यावर तो आळार कालाम यांना असे म्हणाला, 'भन्ते, ह्या पाचशे गाड्या जवळून गेलेल्या आपण पाहिल्या?'

" 'नाही, मित्रा, मी त्या पाहिल्या नाहीत.'

" 'पण, भन्ते, त्यांचा आवाज तुम्ही ऐकला असेल.!'

" 'नाही, मित्रा, मी त्यांचा आवाज ऐकला नाही.'

" 'मग, भन्ते, आपण तेव्हा झोपलेला होता काय?'

" 'नाही, मित्रा, मी तेव्हा झोपलेलो नव्हतो.'

" 'भन्ते, मग आपल्याला त्यावेळी जाणीव होत होती?'

" 'होय, मला जाणीव होत होती.'

" 'म्हणजे, भन्ते, आपण जागे होता, आपल्याला जाणीव होती, पण पाचशे गाड्या एकामागून एक अशा आपल्या अगदी जवळून गेल्या पण आपण त्या पाहिल्या नाहीत, त्यांचा शब्द ऐकला नाही. भन्ते, पहा, त्यांच्या धुळीने तुमचे चीवरही माखले आहे.'

" 'तुम्ही बोलता ते खरेच आहे, मित्रा!'.

"मग त्या माणसाच्या मनात असा विचार आला की ज्यांनी प्रव्रज्या धारण केली आहे (जे घराचा त्याग करून अनिकेत अवस्थेत विहरतात) त्यांनी मनाच्या अशा शांत अवस्थेत विहार करावा हे किती आश्चर्यकारक, किती अद्‌भुत आहे! अशा शांत अवस्थेत की जागृत आणि सजाण असताना पाचशे गाड्या एकामागून अशा आपल्या अगदी जवळून गेल्या तरी त्यांनी त्याला पाहिले नाही किंवा त्यांचा आवाज ऐकला नाही.

"आणि आळार कालाम यांच्याविषयी पूज्यभाव व्यक्त करून तो निघून गेला."

६६. *"आता, पुक्कुसा, तू मला सांग की या दोहोतली कोणती गोष्ट करणे किंवा केलेली आढळणे अधिक दुष्कर, असंभवनीय आहे – जागृत आणि सजाण अवस्थेत असलेला एक माणूस पाचशे शकट एकामागून एक त्याच्याजवळून जात असताना त्यांना पहात नाही किंवा त्यांचा शब्द त्याच्या कानी पडत नाही हे अधिक दुष्कर, असंभवनीय आहे, की जागृत आणि सजाण अवस्थेतील माणूस, जेव्हा त्याच्यावर पावसाचा मारा होत असतो, पाण्याचा वर्षाव होत असतो, विजा आजूबाजूस चमकत असतात आणि गडगडाट करीत असतात, हे काहीच पहात नाही, त्यांचा शब्द त्याच्या कानी पडत नाही हे अधिक दुष्कर, असंभवनीय आहे?'*

"भन्ते, पाचशे शकटांचे आपण काय घेऊन बसला आहात – पांचशे सोडा, सहाशे, सातशे, आठशे, नवशे, किंवा सहस्र किंवा शेकडो सहस्र शकटांनी काय होणार आहे? हेच अधिक दुष्कर, अधिक असंभवनीय आहे की माणूस जागृत आणि सजाण असताना, पावसाचा मारा, वर्षाव होत असताना, विजा चमकत असताना, गडगडाट करीत असताना तो हे सारे पहात नाही, त्यांचा शब्द त्याच्या कानी येत नाही."

*"पुक्कुसा, एकदा मी आतुमा येथे राहात होतो आणि जेथे मळणी चालली होती अशा शेतात होतो. त्यावेळी पावसाच्या धारांचा मारा होत होता आणि वर्षाव होत होता आणि विजा*

*लखलखत होत्या आणि गडगडाट करीत होत्या. आणि भाऊ-भाऊ असलेल्या दोन शेतकऱ्यांचा आणि चार बैलांचा मृत्यू ओढवला. आणि मग, पुक्कुसा, आतुमाहून खूप लोक निघाले आणि जेथे ते दोन शेतकरी बंधू आणि चार बैल मरण पावले होते तेथे गेले.*

*"आता त्यावेळी, पुक्कुसा, मळणीच्या त्या आगाराबाहेर मी आलो होतो आणि त्याच्या प्रवेशद्वाराबाहेर विचार करीत येरझाऱ्या घालीत होतो. आणि, पुक्कुसा, तेथे आलेल्या मोठ्या जनसमुदायातील एक माणूस मी होतो तेथे आला आणि माझ्याजवळ आल्यावर त्याने मला अभिवादन केले आणि तो आदराने एका बाजूला उभा राहिला.*

*"आणि तसा तो उभा असताना मी त्याला विचारले, 'मित्रा, लोकांचा हा मोठा समुदाय येथे का जमला आहे?'*

*" 'पण आताच (काही काळापूर्वी) पावसाचा मारा आणि वर्षाव होत होता आणि विजा चमकत होत्या आणि त्यांचा कडकडाट होत होता. आणि त्यात परस्परांचे बंधू असलेले दोन शेतकरी आणि चार बैल मृत्यू पावले. पण, भन्ते, त्यावेळी आपण कुठे होता?'*

*" 'मित्रा, मी सर्वकाळ इथेच होतो.'*

*" 'पण, भन्ते, आपण ते सर्व पाहिले?'*

*" 'मित्रा, मी काहीच पाहिले नाही.'*

*" 'पण, भन्ते, आपण काही ऐकले का?'*

*" 'मित्रा, मी काहीच ऐकले नाही.'*

*" 'मग, भन्ते, आपल्याला झोप लागली होती का?'*

*" 'मित्रा, मला झोप लागली नव्हती.'*

*" 'मग, भन्ते, आपल्याला जाणीव होती का?'*

*" 'होय, मित्रा.'*

*" 'म्हणजे, भन्ते, आपण जागृत आणि सजाण असताना जेव्हा पावसाचा मारा आणि वर्षाव होत होता आणि विजा लखलखत होत्या, त्यांचा गडगडाट होत होता तेव्हा आपण काही पाहिले नाही आणि त्यांचा नाद ऐकला नाही?'*

*" 'होय, मित्रा, असेच म्हटले पाहिजे.'*

*"मग, पुक्कुसा, त्या माणसाच्या मनात असा विचार आला, 'हे किती आश्चर्यकारक आहे, किती अद्‌भुत आहे की ज्यांनी प्रव्रज्या घेतली आहे ते मनाच्या अशा शांत अवस्थेत काल घालवितात, अशा शांत अवस्थेत की ते जागे आणि सजाण असताना जेव्हा पावसाच्या सरींचा मारा होत असतो, आणि वर्षाव होत असतो, विजा लखलखत असतात आणि त्यांचा कडकडाट होत असतो तेव्हा ते काही पाहात नाहीत, त्यांचे शब्द त्यांच्या कानी पडत नाहीत'. आणि माझ्या विषयीच्या गाढ पूज्यभावनेला उद्‌गार देऊन, मला अभिवादन करून आणि प्रदक्षिणा घालून तो गेला."*

ह्यानंतर मल्लपुत्र पुक्कुस भगवंतांना उद्देशून म्हणाला, "भन्ते, माझी आळार कालामांवर जी श्रद्धा होती तिची अवस्था वावटळीत धान्य पाखडावे (आणि ते उडून जावे) किंवा शीघ्र वाहणाऱ्या नदीच्या प्रवाहात काही धुवावे (व ते वाहून जावे) तशी झाली आहे. उत्कृष्ट होते आपण जे बोलला ते, भन्ते, उत्कृष्ट होते. जे गाडून टाकण्यात आले आहे ते जसे एखाद्याने प्रकट करावे, किंवा जो वाट चुकला आहे त्याला जसा एखाद्याने योग्य मार्ग दाखवावा, किंवा काळोखात जसा एखाद्याने दिवा आणावा म्हणजे ज्यांना डोळे आहेत ते बाह्य रूपे पाहू शकतात, त्याचप्रमाणे भगवन्तांनी अनेक रूपांनी धम्म (सत्य) माझ्यासाठी प्रकाशित केला आहे. भन्ते, मी भगवंतांना शरण जातो, धम्माला (सत्याला) आणि भिक्षुसंघाला शरण जातो. भगवंतांनी आजपासून माझे आयुष्य सरेतो उपासक म्हणून माझा स्वीकार करावा."

६७. मग मल्लपुत्र पुक्कुस एका माणसाला म्हणाला, "भल्या गृहस्था, कृपा करून माझ्यासाठी घासूनपुसून चकचकीत केलेली आणि वापरण्यासाठी तयार केलेली दोन सुवर्णवस्त्रे आण." "जशी आपली आज्ञा," असे म्हणून त्या माणसाने मल्लपुत्र पुक्कुसाला आपली अनुमती दाखविली आणि त्याने घासूनपुसून चकचकीत केलेली आणि नेसण्यासाठी तयार असलेली दोन सुवर्णवस्त्रे आणून दिली. मग मल्लपुत्र पुक्कुसाने घासूनपुसून चकचकीत केलेली आणि नेसण्यासाठी तयार असलेली ती दोन सुवर्णवस्त्रे भगवंतांना दिली आणि तो म्हणाला, "भन्ते, घासूनपुसून चकचकीत केलेली ही दोन सुवर्णवस्त्रे नेसण्यासाठी तयार आहेत. भगवंतांनी माझ्यावर अनुग्रह करावा आणि ती माझ्याकडून स्वीकारावी."

*"मग, पुक्कुसा, एक वस्त्र मला नेसव आणि दुसरे आनंदाला नेसव."*

"जशी आपली इच्छा, भन्ते," असे म्हणून पुक्कुसाने भगवंतांना आपली अनुमती दर्शविली; त्याने भगवंतांना एक वस्त्र नेसविले आणि दुसरे आनंदाला.

मग भगवंतांनी मल्लपुत्र पुक्कुसाला धम्माविषयीचे प्रवचन

अनुक्रमणिका

देऊन उपदेश केला, जागृत व उत्तेजित केले आणि उल्हसित केले. आणि भगवंतांच्या धम्मविषयक प्रवचनापासून उपदेश ग्रहण केलेल्या, त्याने जागृत, उत्तेजित आणि उल्हसित झालेल्या त्या मल्लपुत्र पुक्कुसाने आपल्या आसनावरून उठून भगवंतांना अभिवादन केले आणि त्यांना प्रदक्षिणा घालून त्याने त्यांचा निरोप घेतला.

६८. मग मल्लपुत्र पुक्कुस तेथून निघाल्यानंतर लवकरच आयुष्मान आनंदाने, घासूनपुसून चकचकीत केलेली आणि नेसण्यासाठी तयार असलेली ती दोन सुवर्णवस्त्रे भगवंतांच्या शरीरावर ठेवली आणि भगवंतांच्या शरीरावर ती अशी ठेवली असताना त्यांचे (सुवर्णवस्त्रांचे) तेज मावळले.

आणि आयुष्मान आनंद भगवंतांना म्हणाला, "भन्ते, हे किती आश्चर्यकारक आहे, किती अद्‌भुत आहे की भगवंतांची त्वचा इतकी शुद्ध, इतकी अत्यंत कांतिमान असावी. कारण घासूनपुसून चकचकीत केलेली आणि नेसण्यासाठी तयार असलेली ही दोन सुवर्णवस्त्रे जेव्हा मी भगवंतांच्या शरीरावर ठेवली तेव्हा, पहा, त्यांचे – सुवर्णवस्त्रांचे – तेज मावळल्यासारखे झाले."

*"हे असेच असते, आनंदा, हे असेच असते. आनंदा, असे दोन प्रसंग असतात की जेव्हा तथागताची त्वचा शुद्ध आणि अत्यंत कांतिमान होते. हे कोणते दोन प्रसंग?*

*"आनंदा, ज्या रात्री तथागताला सर्वश्रेष्ठ, सम्यक् संबोधी प्राप्त होते ती रात्र आणि ज्या रात्री तथागताला असे अंतिम परिनिर्वाण प्राप्त होते की अस्तित्वाचा काहीही अवशेष मागे उरत नाही – ह्या दोन प्रसंगी तथागताच्या त्वचेचा वर्ण शुद्ध आणि अत्यंत कांतिमान होतो.*

*"आनंदा, आज, रात्रीच्या तिसऱ्या चरणी, कुसिनारा येथील उपवनात, मल्लांच्या शालवनात, दोन शालवृक्षांच्या मध्ये तथागताचे परिनिर्वाण होईल. चल, आनंदा, आपण कुकुत्था नदीकडे जाऊ."*

"जसे आपण म्हणता, भन्ते," असे म्हणून आनंदाने आपली अनुमती दर्शविली.

दोन सुवर्णवस्त्रे, दोन्ही चमकदार,
पुक्कुसाने आणली होती
ती परिधान केलेल्या गुरूची कांती
सुवर्णासारखी शोभून दिसली.

६९. मग भिक्षूंच्या मोठ्या समुदायासोबत भगवंत कुकुत्था नदीकडे गेले. तेथे गेल्यावर ते नदीत उतरले, त्यांनी स्नान केले आणि पाणी प्राशन केले. मग नदी ओलांडून ते पलीकडच्या तीरावर असलेल्या आंबराईत गेले.

तेथे गेल्यावर ते आयुष्मान चुन्दकाला म्हणाले, "*चुन्दका, एका चीवराची चौपदरी घडी कर आणि ती जमिनीवर पसर. चुन्दका, थकलो आहे, मला पहुडायचे आहे.*"

"भन्ते, जसे आपण म्हणता," असे म्हणून चुन्दकाने भगवंतांना अनुमती दर्शविली आणि एका वस्त्राची चौपदरी घडी करून ते जमिनीवर पसरले.

मग भगवन्त उजव्या कुशीवर, एक पाय दुसऱ्या पायावर ठेवून, त्याला विश्रांती देत, पहुडले. आणि शांत आणि अविचल अशा अवस्थेत असलेल्या त्यांनी आपण योग्य वेळी उठावे असा विचार केला. आयुष्मान् चुन्दक भगवंतांच्या समोर बसला.

बुद्ध ककुत्था नदीला आला
तिचे स्वच्छ पाणी प्रसन्नपणे वहात होते
शिणलेल्या त्याने नदीत बुडी मारली,
ज्याला लोकात उपमा नाही अशा त्या तथागताने.
स्नान करून, जल प्राशन करून त्या गुरूने
भिक्षुसमूहासमवेत नदी ओलांडली.
धम्माचा प्रवक्ता असलेला तो भगवंत,
तो महान् गुरू आंबराईत आला.
तेथे तो चुन्दक भिक्षूला म्हणाला
चीवराची चौपदरी घडी येथे पसर.
आनंदित झालेल्या चुन्दकाने तात्काळ
चीवराची चौपदरी घडी तेथे पसरली.
श्रमलेला, शिणलेला तो गुरू तेथेच पहुडला
आणि तिथे त्याच्यासमोर चुन्दक बसून राहिला.

७०. मग भगवंत आयुष्मान आनंदाला म्हणाले, "*आनंदा, असे होणे शक्य आहे की, धातुकाम करणाऱ्या चुन्दामध्ये पश्चात्तापाची भावना कुणी जागृत करेल. कुणी त्याला म्हणेल, 'चुन्दा, हे तुझे पाप आहे, यामुळे तुला दुर्गती भोगावी लागणार आहे, की तू पुरविलेले शेवटचे अन्न भक्षून तथागताचे परिनिर्वाण झाले.' आनंदा, धातुकर्मी चुंदाला जर असा पश्चात्ताप होऊ लागला तर तो असे बोलून रोखला पाहिजे की, 'चुंदा, हा तुझा लाभ आहे, ही हितकर अशी गोष्ट आहे की तथागताने तू पुरविलेले शेवटचे अन्न भक्षून तो परिनिर्वाणाला गेला. चुन्दा, मी प्रत्यक्ष भगवंतांच्या मुखातून ऐकले आहे, त्यांच्या*



अनुक्रमणिका

*साक्षात् मुखातून ग्रहण केले आहे की, ह्या दोन प्रकारच्या अन्नापासून प्राप्त होणारे फल, प्राप्त होणारा लाभ समान असतो आणि इतर कोणत्याही अन्नापासून प्राप्त होणाऱ्या फलापेक्षा किंवा लाभापेक्षा अधिक असतो. अन्नाचे हे कोणते प्रकार? जे अन्न भक्षण केल्यानंतर तथागताला सर्वश्रेष्ठ, सम्यक् संबोधी प्राप्त होते ते अन्न आणि जे अन्न भक्षिल्यानंतर तथागताचे परिनिर्वाण होते, असे परिनिर्वाण की जे प्राप्त झाल्यावर अस्तित्वाचा काही अवशेष उरतच नाही – ते अन्न. अन्नाच्या ह्या दोन प्रकारांपासून समान फल प्राप्त होते, समान लाभ प्राप्त होतो आणि इतर कोणत्याही अन्नापासून प्राप्त होणाऱ्या फलापेक्षा आणि लाभापेक्षा ह्या अन्नापासून प्राप्त होणारे फल आणि लाभ अधिक असतात.' धातुकर्मी आयुष्मान चुंदाने असे कर्म केले आहे की त्याचे फल म्हणून तो दीर्घायुषी होईल, त्याला चांगला जन्म लाभेल, त्याचा भाग्योदय होईल, त्यांची कीर्ती होईल, त्याला स्वर्ग, आधिपत्य प्राप्त होतील. अशा रीतीने, आनंदा, धातुकर्मी चुन्दाला जर पश्चात्ताप झाला तर त्याला आळा घातला पाहिजे."*

मग भगवंतांनी एकंदर वस्तुस्थिती जाणून त्यावेळी ह्या श्लोकाला उद्गार दिला :

*"जो देतो त्याचे पुण्य वाढते,*
*जो संयत असतो त्याला वैर जाणवत नाही*
*जो कुशल असतो तो पापकर्म सोडून देतो*
*काम, द्वेष आणि मोह यांचे निर्मूलन करून तो निर्वाण प्राप्त करून घेतो.*

**टीपा :**

१. इद्धि (संस्कृत : ऋद्धि) : ह्या शब्दाचा सामान्य अर्थ स्पृहणीय शक्ती असा आहे. उदा. राजाच्या चार इद्धी म्हणजे सुस्वरूप असणे, दीर्घायुष्य, चांगले आरोग्य आणि लोकप्रियता. आध्यात्मिक साधनेच्या संदर्भात अतींद्रिय शक्ती असा इद्धीचा एक अर्थ आहे. अशा दहा शक्ती नमूद करण्यात आल्या आहेत. त्यातील काही अशा : स्वतःच्या मनोमय प्रतिमेचे दूर अंतरावर प्रक्षेपण करणे, अदृश्य होणे, भिंतीसारख्या घन-पदार्थांतून आरपार जाणे, जमिनीत, जणू ते पाणी असल्यासारखे, बुडी मारणे, पाण्यावरून चालणे, हवेतून उडणे, सूर्य, चंद्र ह्यांना स्पर्श करणे, उत्युच्च स्वर्गात आरोहण करणे. बुद्धाच्या मते अशा अतींद्रिय शक्ती कमावण्यात आणि वापरण्यात नैतिक धोका असतो व म्हणून त्या घृणास्पद असतात. बुद्धाला ज्या इद्धी अभिप्रेत आहेत त्या म्हणजे, निर्वाण प्राप्त करून घेण्याच्या उद्दिष्टावर निश्चयाने लक्ष केंद्रित करणे, हा संकल्प स्थिरपणे मनात वाळगणे, सुविचारांवर आणि धम्माचा आशय नीट समजून घेण्यासाठी त्याचे अन्वेषण करण्यावर लक्ष केंद्रित करणे, ह्यासारख्या नैतिक उन्नयनात अभिप्रेत असलेल्या शक्ती होत.

२. **मार** : दुष्ट, विनाशक प्रवृत्ती ज्याच्यात मूर्त झाल्या आहेत, जो मोहात पाडतो आणि नैतिक, आध्यात्मिक साधनेत अडथळे आणतो असा शक्तिमान पापात्मा.

३. **ब्रह्मचरीय** : बौद्ध संदर्भात ब्रह्मचरीय म्हणजे दुःखाचा अंत अंगिकारलेले नैतिक, आध्यात्मिक, साधुवृत्तीचे, धार्मिक जीवन.

४. हा परिषदांचा उल्लेख अचानक येतो. ह्यावरून अनेक ठिकाणी विखुरलेली, भिन्न विषयांचा उहापोह करणारी प्रकरणे एकत्र करून हे सूत्र रचले असणार असा तर्क करता येतो.

५. ध्यानमार्गात जी प्रगती होत जाते तसतसे क्रमाने जे आठ विमोक्ष (मुक्ती, बाह्य पदार्थांशी असलेल्या बंधनापासूनची (सुटका) प्राप्त होत जातात त्याचे हे निवेदन आहे. हे काहीसे गूढ आहे. रूप म्हणजे दृष्टीला प्रतीत होणारे दृश्य आकार. आकाश म्हणजे (रिक्त) अवकाश.

'अनंत विज्ञान' ह्याचा अर्थ जे अनंत आहे असे चैतन्य (life-force), किंवा ज्यातून जड आणि सचेतन वस्तू उद्भवतात असे जड-चेतनस्वरूप तत्त्व (mind-matter). थोडक्यात, बाह्य वस्तूंच्या अनुभवापासून प्रारंभ करून, सर्व क्षणिक मानसिक व भौतिक वस्तूंचा उद्भव ज्यातून होतो त्या अनंत तत्त्वाचा अनुभव ओलांडून शून्याच्या अनुभवात परिणत होणारा असा हा ध्यानमार्ग आहे.

६. हे ***चार सतिपट्ठान*** म्हणजे : १. शरीराविषयीचे चिंतन, २. कल्पनांविषयीचे चिंतन, ३. कल्पनांच्या अभावाविषयीचे चिंतन, ४. विचार व शील यांच्याविषयीचे चिंतन.

***चार सम्यक प्रयत्न*** म्हणजे : १. दुःप्रवृत्ती उदयाला येऊ नये असा प्रयत्न; २. उदयाला आलेली दुष्प्रवृत्ती बाजूला सारण्याचा प्रयत्न; ३. पूर्वी नसलेला चांगुलपणा प्राप्त करून घेण्याचा प्रयत्न; ४. अस्तित्वात असलेला चांगुलपणा वाढविण्याचा प्रयत्न. चार इद्धिपाद म्हणजे : संकल्प, प्रयत्न, विचार आणि अन्वेषण ह्यांच्यावर उत्कटतेने लक्ष केंद्रित करणे आणि दुष्प्रवृत्तीविरुद्ध झगडत रहाणे.

***चार इंद्रिये व सामर्थ्ये*** यांची यादी एकच आहे. ती अशी श्रद्धा, उत्साह, विचार, ध्यान आणि प्रज्ञा.

***बोधीची सात अंगे*** म्हणजे : उत्साह, विचार, ध्यान, अन्वेषण, (सुत्त आणि विनय यांचे), आनंद, शांती आणि प्रसन्नता.

***आर्य अष्टांगिक मार्ग*** प्रसिद्ध आहे.

अनुक्रमणिका

# अक्षरवेध

***यांनी जग घडवले*** *या मालिकेतील पुस्तके : लुई ब्रेल*, महात्मा गांधी*, चार्ली चॅप्लिन*,*
*मिखाइल गोर्बाचेव्ह*, अब्राहम लिंकन*, मदर तेरेसा*, फ्लॉरेन्स नाईटिंगेल*, मारिया मॉन्टेसरी**
***यांनी जग बदलले*** *या मालिकेतील पुस्तके : अलेक्झांडर ग्रॅहम बेल*, चार्ल्स डार्विन*, गॅलिलिओ गॅलिली*,*
*ॲल्बर्ट आईनस्टाईन*, आयझॅक न्यूटन*, अलेक्झांडर फ्लेमिंग**
***महान उद्योजकांच्या कथा*** *: बिल गेट्स*
***प्रकाशक*** *: ओरिएंट लाँगमन, मुंबई, १९९७–१९९८; प्रत्येकी रु. ४०.००.*

*यांनी जग घडवले* व *यांनी जग बदलले* अशा या दोन मालिका आहेत. पहिल्या मालिकेत एकूण १४ पुस्तके आहेत. त्यांपैकी नमुन्यादाखल ८ पुस्तके (* ही खूण केलेली) मला वाचायला मिळाली. *यांनी जग बदलले* या मालिकेतील ७ पैकी ६ (* ही खूण केलेली) पुस्तके मी वाचलेली आहेत. याशिवाय *महान उद्योजकांच्या कथा* अशी एक तिसरी मालिकाही आहे. त्याचे केवळ एकच पुस्तक मला मिळाले.

पुस्तके म्हणायचे परंतु या ६४ पानी डेमी आकाराच्या पुस्तिका आहेत. चांगल्या प्रतीचे वेष्टन व आंत अनेक चित्रांचा, छायाचित्रांचा व उद्धरणांचा वापर यामुळे ही पुस्तके वाचकांचे लक्ष वेधून घेतात. नावावरूनच लक्षात यावे तशी, ही सर्व महान व्यक्तींची चरित्रे आहेत. त्यांपैकी समाजाला वेळोवेळी, विशेष दृष्टीने वळण देणाऱ्या व्यक्तींची चरित्रे *यांनी जग घडवले*त आहेत, तर काही अतिशय महत्त्वाचे संशोधन करून तोवर ध्यानी न आलेले निसर्गाचे रहस्य शोधून काढणाऱ्या किंवा मानवी जीवन अधिक सुखमय, सुसह्य करणाऱ्या शास्त्रज्ञांची चरित्रे *यांनी जग बदलले*च्या यादीत आहेत.

या एरवी डोंगराएवढ्या माणसांचे कार्य थोडक्या जागेत मांडणे ही खरोखर तारेवरची कसरत ठरते. बालपण, कुटुंब, जीवनप्रवास, कार्याबद्दलची ओढ, केलेले प्रत्यक्ष कार्य आणि या सर्वांच्या तळाशी असलेली सामाजिक परिस्थिती यांचे एकत्रित चित्रण या पुस्तिकांमध्ये केलेले आहे. चरित्रांच्यामध्ये यापद्धतीने सामाजिक परिस्थितीचा व त्यामध्ये व्यक्तीच्या जीवनदृष्टीविकसनाचा समावेश सर्वसामान्यपणे क्वचितच केलेला दिसतो. समाजपरिस्थितीत त्या कार्याची घेतली गेलेली दखल, प्रसंगी झालेला विरोध, त्यामागचा विचार यांनाही यामध्ये स्थान आहे. काही वेळा व्यक्तीची विचार-दृष्टी आणि कार्य प्रत्यक्षात यावे म्हणून घेतलेले निर्णय यांची एकमेकांशी विसंगती जाणवते. या विसंगतीचाही उल्लेख करून, तसा निर्णय घेण्यामागे काय विचार असावा हेही मांडण्याचा प्रयत्न यामध्ये आहे. तरीही योग्य-अयोग्यतेचा निवाडा फारसा केलेला नाही. चित्र व उद्धरणांच्या साहाय्याने वातावरणनिर्मितीही चांगली साधली आहे. ही या पुस्तिकांची जमेची बाजू आहे.

या दोन मालिकांमधील अनेक चरित्रे वाचनात आल्यामुळे आणखी एक गोष्ट जाणवली. सामान्य माणसे व महान कार्य करणारी माणसे यांच्यामध्ये मुळातून फरक असतोच का? काहीच माणसे महान कार्य करतात आणि इतरांना मात्र ते साधत नाही याचे कारण काय असावे? – असा विचार आपण अनेकदा करत असतो. उदा., स्त्री-पुरुष नातेसंबंधांचा आणि व्यक्तीच्या महान कार्याचा एकमेकांशी काही संबंध असतो काय, असा विचार माझ्या मनात आला. त्यादृष्टीने या चरित्रांमध्ये काही वेधक निरीक्षणे करता आली. मूळ यादीत आणखी अनेक स्त्रिया असल्या तरी मी वाचलेल्या पुस्तकांत फ्लॉरेन्स नाईटिंगेल, मादाम मॉंटेसरी व मदर तेरेसा या तिघींचीच चरित्रे होती. या तिघींनीही लग्नाचा विचार दूर ठेवलेला होता. तरीही फ्लॉरेन्स नाईटिंगेल यांच्या मित्राची त्यांना होणारी मदत, त्यांच्या मृत्यूचे दुःख आपले लक्ष वेधते. आणि मादाम मॉंटेसरी यांच्या कार्यात त्यांच्या मुलाचा सहभाग आढळतो. पण त्याच वेळी त्याला भाचा असे पुकारून मूळ नाते गुप्त ठेवण्याचा प्रयत्न मनात प्रश्न निर्माण करतो. चार्ली चॅप्लीन यांच्या सर्व कार्यावर त्यांच्या आईचा मोठाच प्रभाव होता. मानसिक संतुलन जाग्यावर नसलेल्या या स्त्रीबद्दल फार जाणिवेनं लिहिलेलं आहे. तर, आइनस्टाईन यांनी आपल्या नोबेल पारितोषिकाची संपूर्ण रक्कम तोपर्यंत घटस्फोट झालेल्या







अनुक्रमणिका

आपल्या प्रथम पत्नीला दिली. तिचाच त्यावर अधिकार होता असं त्यांनी म्हटलं. प्रथम पत्नीशी झालेल्या चर्चांचा त्यांना संशोधनात मोठाच उपयोग होत असे. ती स्वतः पदार्थविज्ञान-शास्त्रात प्रवीण होती. तर दुसरी पत्नी आपण थोर पतीची पत्नी आहोत यात गौरव मानणारी, साधीसुधी मनमिळाऊ गृहिणी होती. आइनस्टाईन यांनी एकीशी घटस्फोट घेतला, पण दुसरीसहदेखील त्यांना समाधान वाटत नसेच. पुढे जाऊन, आपल्याला एका स्त्रीसह आनंदानं जगता आलं नाही याचा विषादही वाटे. अलेक्झांडर ग्रॅहम बेल यांच्या पहिल्या शोधामागची महत्त्वाची प्रेरणा भरपूर पैसा मिळवणे आणि त्यायोगे नकार देणारी पण विशेष आवडलेली तरुणी 'पटवणे' अशी होती. अशा प्रकारची निरीक्षणे आपल्याला एक वेगळेच भान देतात, विचार करायला लावतात.

ही पुस्तके वाचताना मला स्वतःला आणि माझ्या मते कुणाही सामान्य वाचकाला खूप नव्या गोष्टींची माहिती मिळते. यांतल्या अनेक व्यक्तींबद्दल व त्यांच्या मुख्य कार्याबद्दल आपल्याला आधीपासून माहिती असली तरी या पुस्तिकांच्या वाचनानंतर आवाका वाढतो यात शंका नाही. तसेच, ज्यांच्याविषयी मोठे चरित्रग्रंथ लिहावेत, जीवनावर अनेकांनी संशोधन करावे अशी योग्यता असलेल्या या व्यक्तींचे हे छोटेखानी चरित्र छापण्यामागे ती पुस्तके मराठीभाषिक सामान्य वाचकांनी वाचावी, इंग्रजी भाषेच्या सहजतेविना हे वाचन अडून राहू नये, विशेषतः कुमारवयीन मुलामुलींनीही वाचावी हा हेतू असणार. ही सर्व पुस्तके श्रीमती हेलन एक्सले यांनी संपादित केलेली असून ती विविध परदेशी लेखकांनी लिहिलेली व मागाहून मराठीत भाषांतर केलेली आहेत. सहाजिकच भाषांतरित लेखनाचे गुणदोष त्यांत उतरलेले आहेत. इंग्रजी पद्धतीच्या वाक्यरचना अनेक ठिकाणी केवळ मराठी शब्द वापरून केलेल्या आहेत. उदाहरण द्यायचं तर महात्मा गांधींवरील पुस्तकात "त्यांचे आयुष्य हे कुठल्याही विशेष सवलतीने सुरू झालेले नव्हते" (पान क्र. ३, वरून २री ओळ) असे वाक्य आहे. आयझॅक न्यूटन यांच्यावरील पुस्तकात "तो मुलांचा प्रमुख झाला व वर्गमित्रांबरोबरच शिक्षकांच्या आदराला पात्र झाला." अशा प्रकारची वाक्ये या दोनही मालिकांमध्ये ठायीठायी आढळतात. अशी वाक्ये वाचताना इंग्रजीची जाण असणारांना मूळ इंग्रजी वाक्यच दिसू लागते. या पुस्तिका संपादित करण्यामागे काय भूमिका आहे हे संपादकाने कोठेही न मांडल्याने काही प्रश्न अपरिहार्यपणे पडतात. उदा., *यांनी जग घडविले* या मालिकेत जो सामाजिक आशय मांडायची आवश्यकता आहे त्यामानाने ही ६४ पानी पुस्तिका खूपच कमी पडते. त्यामुळे अनेक ठिकाणी मुद्दा सुरू होऊन तो अर्धवटच सोडून द्यावा लागला आहे. हे टाळता आले नसते काय? त्यामानाने *यांनी जग बदलले* मालिकेत केवळ शास्त्रज्ञ घेतलेले असल्याने ती प्रक्रिया अधिक चांगली मांडता आल्याचे जाणवते. परंतु या मालिकेत केवळ शास्त्रज्ञच का असावेत याबद्दल किंवा व्यक्तींच्या निवडीबद्दलचे काही निकष होते किंवा काय याबद्दल कुठेही मांडलेले नाही. त्यामुळे त्यामागची भूमिका समजावून घेणे अवघड होते.

'जग' असा शब्द वापरलेला असल्याने ते 'बदलण्याची', 'घडवण्याची' जबाबदारी केवळ युरोप व अमेरिकन व्यक्तींवरच सर्वाधिक होती का?, असा काहीसा प्रश्न पडतो. महात्मा गांधी, नेल्सन मंडेला व दलाई लामा, कार्याच्या पातळीवर मदर तेरेसा हे सोडले तर बाकी सर्व पाश्चिमात्य — विकसित म्हणवल्या गेलेल्या — जगातून येतात. इथे आणखी एक प्रश्न उपस्थित होतो की, महात्मा गांधींचे किंवा मदर तेरेसांचे चरित्र लिहिण्याचे काम कुणा भारतीय लेखकाने केले असते तर ते अधिक दर्जेदार झाले असते, निदान भारतीय पद्धतीने आले असते. कारण विशेषतः गांधींवरील पुस्तक (कदाचित महात्माजींबद्दल एरवीही वाचन घडते त्यामुळे) पुष्कळच अपुरे, रसहीन वाटते. तसेच मदर तेरेसा यांच्या कार्याचे महत्त्व जाणूनही अनेकांना त्यामध्ये गंभीर प्रश्न, विसंगती दिसतात, त्यांचा उल्लेख या पुस्तकात नाही.

कदाचित या संपादिकेच्या किंवा व्यवस्थेच्या मर्यादा असतील, परंतु जगभरातील महान व्यक्तींची चरित्रे तयार करताना थोडा अधिक विचार करून लेखन व्हावयास हवे होते. विशेषतः अनेक भाषांमध्ये भाषांतरित होऊन जगभर प्रसार करण्याची दृष्टी असताना. यांत अनेक नावांचीही भर घालता येईल, असे सुचवावेसे वाटते. तरीही एकंदर प्रयत्नातील आकर्षकता, दृष्टी, लेखन आणि सर्वात महत्त्वाचे म्हणजे त्या त्या व्यक्तीचे महान कार्य यामुळे ही पुस्तके आवर्जून वाचावीत अशीच आहेत. विशेषतः कुमारवयीन मुला-मुलींसाठी पालकांनी ही पुस्तके जरूर आणावीत. पुस्तकांत शेवटी आणखी वाचनासाठी काही पुस्तकांचा उल्लेख केलेला आहे. त्याचाही वापर विस्तृत वाचनासाठी चांगला होईल.

***संजीवनी कुलकर्णी***

अनुक्रमणिका





**आपुलकी** - पु.ल. देशपांडे, मौज प्रकाशन गृह, मुंबई, १९९८; रु. ८०.००

१९५७ ते १९९८ या काळात लिहिलेली *आपुलकी*तील ही व्यक्तिचित्रे पु.लं.च्या निकटवर्तीयांची आहेत. पु.लं.च्या नेहमीच्याच खुसखुशीत, खट्याळ, खोडकर, मिस्किल आणि नर्म अशा शैलीतून ही व्यक्तिचित्रे उतरली आहेत. या सुहृदांची नेमकी शक्तिस्थाने आणि मर्मस्थाने हेरून पु.लं.नी त्यांची ओळख करून दिली आहे. माधव आचवलांची ओळख करून देताना म्हटलंय, "चित्र, स्थापत्य, शिल्प, साहित्य या विषयांत रमलेला माधव निर्मितिक्षम कलावंत होताच पण तितकाच मोठा आस्वादक होता." बालगंधर्व आणि वसंतराव देशपांडे या दोन गानश्रेष्ठांचा परिचय करून देत असताना पु.लं.च्या रसिकत्वाचा आणि दर्दीपणाचा प्रत्यय वाचकाला येतो. "संगीताला मी माझ्या उपकारकर्त्याच्या जागी मानतो" असे ते म्हणतात. बालगंधर्वांच्या सूरलयीवर त्यांची भक्ती आहे. बालगंधर्वांचे गाणे त्यांना 'झऱ्यासारखे स्वयंभू, झऱ्यासारखे थुयथुयणारे' वाटते. इतकेच नव्हे तर ते गाणे म्हणजे, "इथे जणू निर्मळ सुरांचे सौंदर्य माहेराला आले आहे" असे वाटणारे. उलट वसंतराव देशपांडेंचे गाणे म्हणजे "स्वरांच्या झंझावाताचा सहजपणे साक्षात्कार घडवणारे. एका क्षणात गाण्यात एकाग्र आणि तद्रूप होण्याची" त्यांची प्रचंड शक्ती. "तार षड्जाला पोहोचवायचे मनात आले की पोहोचला."

कवी गिरीशांची त्यांच्या मनात प्रतिमा आहे ती गृहस्थधर्माला अग्रहक्क देणाऱ्या कुटुंबप्रमुखाची. कवी म्हणून त्यांचे कलावंतपण मान्य करीत असतानाही ते राहतात फक्त पु.लं. चे 'दादा'च. उलट, अनंत काणेकरांच्या देखण्या कवितेचे वर्णन ते फार नजाकतीने करतात. "विसाव्या शतकातल्या तिसऱ्या-चौथ्या दशकांमध्ये नाजूक असलेल्या सुंदर अशा एका निराळ्याच कवितेने, सुविद्य असून सुस्वरूप आणि सौजन्यशील-देखील असलेल्या एखाद्या तरुणीसारखा मऱ्हाटी रसिकांच्या दुनियेत प्रवेश केला आणि वातावरणात एक चांदण्याची शीतलता आली."

नाटक हे तर पु.लं.चे आत्मीयच. या क्षेत्रातील साऱ्या वाटा, पायवाटा, आडवाटा, वळणे, आडवळणे, दगडधोंडे, खाचखळगे पु.लं. नी प्रत्यक्ष पाहिलेले. म्हणूनच, ज्या ठिकाणी कशाचीच शाश्वती नाही त्या वाटेवर स्वतःला बिनधास्तपणे झोकून देणारे अनेक रंगकर्मी पु.लं. ना भेटले. त्यात नाट्यरंगी रंगलेले शरद तळवलकर आहेत तसा शंकर घाणेकरांसारखा एक हसवणारा फकीरही आहे. दोघेही विनोदी अभिनेते. पण प्रत्येकाच्या अभिनयाची जात मात्र वेगळी. ज्या काळात रंगभूमीवर गद्य नटाला दहापंधरा रुपयांहून अधिक नाईट मिळत नव्हती त्या काळात रंगभूमीवर सर्वस्व झोकून देऊन तळवलकर या नाट्यक्षेत्रात आले. एक तारखेला मिळणाऱ्या पगारातून येणाऱ्या स्थैर्याकडे पाठ फिरवली. त्यांचं हे झोकून देणं कसं होतं हे सांगताना पु.ल. म्हणतात, "ही सगळीच वाट काही तो पायघड्यांवरून चालत गेला नाही; पण सामान्यांच्या नजरेला न दिसणारी एक निखळ आनंदाची पायघडी मात्र त्याच्या पायाखाली सदैव होती." स्वतःच्या सुखदुःखाची फिकीर न करता अनेकांना आपल्या भाकरीतला चतकोर गुपचूप देणारा शंकर घाणेकरांसारखा नाट्यवेडा फकीरही त्यांना याच वाटचालीत भेटला. थिएटर हेच त्याचे खरे घर होते. आयुष्यभर दुसऱ्याला मदत करीत राहणारा शंकर घाणेकर स्वतः मात्र शेवटपर्यंत निष्कांचन राहिला. शेवटी गेला तोही रंगमंचावरच. या हसऱ्या फकिराचं हे असं जाणं वाचकाच्या जिव्हारी लागून जातं!

सामान्य माणसातले असामान्यत्व शोधणे हा पु.लं. चा आणखी एक स्वभावविशेष; छंद म्हणा हवं तर! म्हणूनच कोल्हापूरच्या एका साखर कारखान्याचे जनरल मॅनेजर असलेल्या नाट्यवेड्या मदनमोहन लोहियांमधला कलावंत त्यांना दिसू शकतो. पु.लं. च्याच म्हणण्याप्रमाणे "एकाच माणसात अनेक माणसे कोंबलेली असतात." पण त्यांना शोधून काढण्याची दृष्टी मात्र पाहिजे, आणि ती पु.लं.जवळ आहे. साखरेचा व्यापार करणारे मारवाडी लोहिया आणि खाडिलकरांच्या *स्वयंवर* नाटकातील रुक्मिणीची 'दादा ते आले ना' असे म्हणताना ही एंट्री कशी घ्यायची या चिंतेत आपल्या बेडरूममध्ये फेऱ्या घालीत रात्रभर जागरण करणारे लोहिया यांचा मेळ कसा घालायचा, असा प्रश्न पु.लं.ना पडतो. 'शारदा नाटकातील शारदा वयानं केवढी दाखवावी' असा त्यांचा अनपेक्षित प्रश्न पु.लं.ना दचकवतो. मूळात मराठीचा गंधही नसलेला हा राजस्थानी मारवाडी माणूस नाटकाच्या छंदासाठी मराठी शिकतो.






अनुक्रमणिका

मराठी नाटकांच्या वेडाने हा मारवाडी संपूर्ण मराठी होतो. स्वतःला संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीत झोकून देतो. 'आमच्या कोल्हापूरला' अशीच त्याची भाषा बनते. पण त्यांच्या या मराठीपणाला जेव्हा कोल्हापूरचेच काही लोक धक्का लावतात तेव्हा मात्र त्यांना जबरदस्त धक्का बसतो. पण यातूनही ते सावरतात आणि पुन्हा 'नाटके' कशी चांगली होतील या चिंतेत बुडून जातात. एका सामान्य माणसाचं असामान्य कलावंतपण जपणारं हे व्यक्तिचित्र अंतर्बाह्य सुरेख आहे.

*आपुलकी* मधील ह्या व्यक्ती कलावंत आणि नामवंत म्हणून श्रेष्ठ आहेतच. पण त्यामागील 'माणूस' म्हणून असणारं त्यांचं 'माणूसपण' हे अधिक श्रेष्ठ आहे. त्याचा शोध घेत घेत पु.ल. ही व्यक्तिचित्रे अधिक रम्य करतात. या कलावंतांचं 'माणूस असणं' त्यांना जाणवत राहतं. म्हणूनच म.म. दत्तो वामन पोतदार गेल्याची बातमी ऐकल्यावर एक थोर इतिहाससंशोधक गेला, एक विद्वान माणूस गेला असं वाटण्यापेक्षा आपल्या घरातील कुणीतरी खूप जिव्हाळ्याचे 'वडीलधारे माणूस' गेल्याची हळहळ त्यांना वाटते. त्यांच्या मृत्यूनंतर "दादा गेले म्हटल्यावर त्यांचा सहवास लाभलेल्या माणसांना एक थोर इतिहास-संशोधक गेला, विद्वान माणूस गेला याहीपेक्षा आपल्याला समोर बसवून काही चांगले सांगणारा माणूस गेला याचे दुःख अधिक झाले" असे ते म्हणतात.

वसंतराव देशपांडेंची गायकी त्यांना जेवढी श्रेष्ठ वाटते तेवढीच त्यांची मैत्रीही त्यांना प्रिय वाटते. म्हणूनच वसंतरावांचे 'नसणे' निमूटपणे स्वीकारायला त्यांचे मन तयार होत नाही. "आपल्या अंतर्यामी कुणीतरी इतके खोलवर जाऊन आपले जीवन समृद्ध करीत होता–फुलवत होता, भेटीचे क्षण सोन्याचे करत होता ही जाणीव वसंता ह्या जगातून गेल्यावर इतक्या तीव्रतेने झाली की त्या वास्तवाशी माझे सुप्त मन जमवून घ्यायला राजी नाही," अशी प्रतिक्रिया ते व्यक्त करतात.

आपुलकी वाटायला लावणाऱ्या अनेक व्यक्ती पु.लं. ना भेटल्या. त्यात 'शिक्षकांचे शिक्षक' असलेले जे.पी. नाईकही आहेत. "नाईकसाहेबांची शिक्षणक्षेत्रातील कामगिरी 'अलौकिक' ह्या एकाच सदरात घालण्यासारखी" अशा शब्दात पु.ल. नाईकसाहेबांचा गौरव करतात. झपाटल्यासारखे काम करण्याच्या त्यांच्या क्षमतेबद्दल पु.ल. म्हणतात – "एक गोष्ट मात्र खरी की, ज्या क्षणी डोक्यातला जो कप्पा त्यांनी उघडला असेल त्यात मात्र ते कायावाचामनेकरून असतात. त्यांच्या साऱ्या झपाटलेपणाचे रहस्य मनाच्या ह्या असंख्य प्रकाशमान गुहांमध्ये संपूर्णपणाने जाऊन बसण्याच्या अद्‌भुत शक्तीत आहे. या गुहेत दैवयोगाने ज्यांना जायला मिळाले त्यांनी तो आपल्या जीवनातील भाग्याचा क्षण मानायला हवा." आणि हे भाग्य पु.लं. च्या वाट्याला आले आहे. गांधीजींच्या जीवनशिक्षणाच्या कल्पनेला सर्वस्वाने वाहून घेतलेल्या जे.पी. नाईकांच्या या कार्याची अनेकांना कल्पनाही नाही, याची खंतही पु.ल. व्यक्त करतात.

वर्तमानपत्रातून अत्यंत सुंदर अग्रलेख लिहिणारे गोविंदराव तळवलकरांसारखे अग्रणीही *आपुलकी*त भेटतात. गोविंदराव हे पु.लं. चे मित्र. ही मैत्री ग्रंथप्रेमातून जुळलेली. वाणीपेक्षा लेखणीवर अधिक विश्वास असणारे गोविंदराव आपल्या वर्तमानपत्रातून अग्रलेख लिहिताना उगीचच कुणावरही असभ्य आणि अश्लाघ्य टीका करीत नाहीत. विनोद आणि माफक वक्रोक्ती या गुणांमुळे त्यांचे अग्रलेख वाचनीय असतात. आपल्या या मित्राचे व्यक्तिचित्रण पु.लं. नी फार खुसखुशीतपणे रंगविले आहे. नर्म विनोदाची झालर असलेले हे व्यक्तिचित्र वाचकाच्या मुखावर हास्याची लकेर उमटवल्याशिवाय राहत नाही.

नाटकधंद्यातील माधव वालावलकरांचे चित्रही असेच मनोवेधक आहे. भूमिकेत तद्रूप होण्याची विलक्षण शक्ती, भजनी गायकीतला उंच सूर आणि प्रासादिक गायकी या दोन्ही वैशिष्ट्यांमुळे श्रवणीय होणारी त्यांची नाट्यगीते या सर्वांचा पु.लं.नी फार आत्मीयतेने परिचय करून दिला आहे. माधवरावांच्या व्यक्तिमत्वातील सौम्यपणा सांगताना ते म्हणतात, 'माधवरावांपेक्षा अभिनयात आणि गायनात अधिक तरबेज नट मला पाहायला मिळाले. पण विजेच्या दिव्याच्या झगमगाटात तुळशीवृंदावनातली एखादी पणती मनात साठून राहावी तसे माधवरावांच्या सहवासातले क्षण माझ्या मनात साठून राहिले आहेत."

साध्या लोकांसाठी लिहिणारे आणि साध्या लोकांच्या दुव्वावर जगणारे शुक्ल कवींसारखे साधेभोळे व्यक्तिमत्वही पु.लं. च्या लेखणीतून वाचकांसमोर साक्षात उभे राहते. त्यांच्या प्रतिभेचे वर्णन करताना पु.लं. नी फार सुंदर उपमा वापरली आहे. "प्रक्षोभ निर्माण करणारी त्यांची प्रतिभा नाही. देवघरातल्या उदबत्तीसारखी नम्रपणे दरवळणारी, घटका दोन घटका लोकांना प्रसन्न करणारी." हा उदबत्तीचा दरवळ वाचकाचे मन खरोखरच प्रफुल्लित करतो.

अनुक्रमणिका








या 'पुरुष'क्षेत्रातील *आपुलकी*च्या गोतावळ्यात एकुलती एक स्त्री वाचकाला भेटते – आवाबेन ('आमची आवाबेन'). मूळ पारशी असलेली माहेरची आवाबेन हवेवाला लग्नानंतर आवाबेन देशपांडे होते. १९४२ साली 'भारत छोडो' चळवळीच्या पूर्वतयारीच्या काळात, विलेपार्ल्याच्या सभेत राष्ट्रभक्तीची गाणी, पोवाडे म्हणणाऱ्यात रसरशीत चेहऱ्याची, अंगातून उत्साह ओसंडून चालला आहे अशी एक विशीतली, निकोप आवाजात गाणारी मुलगी पु.लं. ना भेटते. तीच आवाबेन. सेवादलात स्वतःच्या कर्तृत्वाचा ठसा उमटवणारी आवाबेन देशातली राजकीय परिस्थिती बदलल्यावर सामाजिक कार्यात शिरली. तिथेही तिने तनमनासकट स्वतःला झोकून दिले. सानेगुरुजींनी दिलेल्या स्फूर्तीतून पेटवलेली हातातली अदृश्य मशाल मात्र जोमाने मुठीत धरून निघालेल्या आवाबेनच्या जीवनाच्या मशालीवर एका दुर्धर रोगाने झडप घातली आणि ती रसरसती मशाल विझवून टाकली. पण मृत्यूनंतरही "साने गुरुजींच्या धडपडणाऱ्या मुलांच्या मेळाव्यातील ही सानेगुरुजींची मानसकन्या स्वर्गातसुद्धा गुरुजींपुढे त्याच निर्मळ मनाने 'ॲकला चालो रे' हे गीत गात गेली असेल आणि गुरुजींना म्हणाली असेल, 'गुरुजी, मी आवाबेन – इथं काय काय काम करायचं सांगा ना –' जीवाला फार फार चटका लावून जाणारं हे व्यक्तिचित्र आहे. वाचकाचे डोळे भरून येतील असं! आवाबेनबद्दलच्या पु.लं.च्या सर्व आत्मीय भावना लेखात प्रकट झाल्या आहेत.

*आपुलकी*तून ह्या साऱ्या व्यक्ती आपल्यासमोर जणू प्रत्यक्ष उभ्या राहतात. पु.ल. कधीकधी त्यांच्या वेषभूषेचेही इतके बारकाईने वर्णन करतात, की जणू शब्दांनी काढलेला रंगीत फोटोच! दत्तो वामन पोतदारांच्या वेषभूषेचे वर्णन करताना ते म्हणतात – "त्यांची ती पगडी, कपाळावरचे ते आडवे गंध, उपरणे, तो शेरवाणीसारखा डगला, सडसडीत देहयष्टी आणि उत्तम आरोग्याची साक्ष पटवणारा चेहरा." कवी गिरीशांच्या वेषभूषेचेही असेच बारीक वर्णन त्यांनी केले आहे. "उदी किंवा निळ्या रंगाचा ब्लेझरचा कोट -- चकचकीत पितळी बटनांचा. कोटाच्या कॉलरवर नीट बसवलेली पांढऱ्याशुभ्र शर्टाची पोलो कॉलर, तांबूस कृष्ण वर्ण, मुद्रेवरचे भाव कवितेतल्या भावानुरूप बदलणारे...."

अशी ही पंधरा व्यक्तिचित्रे. पु.लं.वर मराठी वाचक भरभरून प्रेम करतो. *आपुलकी*ने त्यात भरच घातली आहे. या पुस्तकातील आणखी एक सुखद भाग म्हणजे पुस्तकातले पु.लं. चे एक हसरे आणि प्रसन्न छायाचित्र. त्यामुळे या पुस्तकाच्या अंतर्बाह्य स्वरूपात एक सुखद भर पडली आहे.

*नीलम हातेकर*



# पत्रव्यवहार

### सत्यवतीच्या सत्याचा शोध

फेब्रु. ९९ : अंकात पृ. ५७ वर 'सत्यवतीच्या सत्याचा शोध' (विश्वनाथ खैरे – नोव्हें.-डिसें. ९८) या लेखावरील शरद् पाटील लिखित टिप्पणी प्रसिद्ध झाली आहे. 'स.स. शोध' लेखाच्या संदर्भाने टिप्पणीतील विधाने आणि शेरे यांच्या संबंधी वाचकांनी पुढील मजकुराची दखल घ्यावी.

**टि. १** — "सत्यवती ही क्षत्रिय होती की कोळीण या वादावर लिहिलेला हा लेख काहीही ठोस सिद्ध करीत नाही."

**लेख** - पृ. ५३ : त्या चरित्रावरून काढलेल्या सामाजिक-सांस्कृतिक निष्कर्षांचा विचार करण्याचा या लेखाचा उद्देश नाही.

पृ. ६१ : शब्दसंहितेच्या मिथ्य-मिथ्यकथा-लोककथा-पुराणकथा.... स्वरूपाची जाणीव ठेवली तरच तिचे यथार्थ आकलन करून घेता येईल. भारतीय संस्कृतीचे सम्यक् दर्शन होण्यासाठी महाभारताच्या अशा आकलनाची आणि अर्थनांच्या तपासणीची निकडीची गरज आहे.

या संदर्भात पुढे टि. ७ संबंधी खुलासाही पाहावा.

**टि. २** — "अन्वेषणपद्धतीची दोन टोके खैरेंनी दाखवली असली तरी त्यांची अन्वेषणपद्धत डॉ. मेहेंदळेंप्रमाणे अध्यात्मवादी आहे."

**लेख** — 'आधी आकलन; मग अर्थन' या पृ. ५७-५८ वरील छेदकावरून, टिप्पणीतला शेरा चुकीचा आहे हे वाचकांच्या ध्यानात येईल.

**टि. ३** — "महाभारत म्हणजे 'विश्वातल्या गोचरांना मिथ्यव्यक्तींची रूपे देऊन महाभारतातला 'कौटुंबिक कटकटी'तला (फॅमिली फ्यूड मधला) परिवार निर्माण केला आहे" असा त्यांचा निष्कर्ष आहे.

**लेख** - पृ. ५७ : महाभारत हा इतिहासग्रंथ नसून पुराणकथांचा प्रचंड संग्रह आहे हे मान्य केल्यावर त्याच्या अभ्यासाचे टप्पे स्पष्ट होतात.

पृ. ५७ : डॉ. रा.ना. दांडेकर यांचे महाभारतविषयक मत..... "एका सर्वसामान्य कौटुंबिक कटकटीला महाकाव्यात संवर्धित केले आहे.." (A commonplace family feud is subjected to epic magnification..) (पृ. ५७)

पृ. ६० : एकच डोंगर कोरून देव, देऊळ आणि परिवार निर्माण करावे तसे एका विश्वातल्या गोचरांना मिथ्यव्यक्तींची रुपे देऊन महाभारतातला 'कौटुंबिक कटकटी'तला (फॅमिली फ्यूड मधला) परिवार निर्माण केला आहे. (पृ. ६०)'

टि. ३ मधल्या विधानात अर्थसंगती नाही. त्या विधानातला अवतरणी मजकूर लेखात वेगळ्या संदर्भात आला आहे. 'असा त्यांचा निष्कर्ष आहे' हा वाक्यांश 'महाभारत म्हणजे...' याच्या संमुख घालणे समर्थनीय नाही. टि. ३ च्याच पुढे टि. ४ हे पुढील विधान आहे.

**टि. ४** — "महाभारताचा भौतिक आधारच काढून घेतल्यानंतर त्यातील सामाजिक वास्तवाकडे दुर्लक्ष करायच्या टीकांविरुद्ध ते इशारा कशासाठी देतात?"

**लेख** - पृ. ५७ : महाकाव्यातल्या सामाजिक-सांस्कृतिक आशयाच्या बाबी तर केवळ वैचारिक असल्यामुळे पुरातत्त्वीय भौतिक वस्तूंसारखे पडताळ्याचे पुरावेही त्यांच्याविषयी मिळणार नाहीत. त्यामुळे त्यांच्या संदर्भात ही सावधानी अनेक पटींनी जास्त प्रमाणात बाळगावी लागेल.

टि. ३ मधील अवतरणातल्या मजकुरात डॉ. दांडेकरांचे मत आणि लेखातली विधाने यांची मिसळ झाली आहे. महाभारतातल्या मिथ्यांना विश्वातल्या गोचरांचा म्हणजे भौतिक आधार आहे हे लेखात सांगितले आहे. त्यामुळे 'महाभारताचा भौतिक आधार काढून घेतल्या'च्या म्हणण्याला लेखात आधार नाही. सावधानीचा इशारा 'सामाजिक वास्तवाकडे दुर्लक्ष करायच्या टीकांविरुद्ध' नाही हे उघड आहे.










अनुक्रमणिका

**टि. ५** — "महाभारत इतिहास नसून केवळ साहित्य आहे असे ते वारंवार म्हणतात."

**लेख** - पृ. ६० : यात या महाकाव्याकडे इतिहास म्हणून न पाहता साहित्य म्हणून पाहिले आहे. या साहित्यातली पात्रे आपल्या सांस्कृतिक जीवनाचा अविभाज्य भाग झाली आहेत.

आठनऊ पानांच्या लेखात फक्त या दोन सलग वाक्यांत महाभारताकडे साहित्य म्हणून पाहिल्याचा उल्लेख आहे; टि. ५ मधल्या 'वारंवार' या शब्दाला काही आधार नाही.

**टि. ६** — "द्वारकेचा शोध घेणाऱ्यांची जशी ते टिंगल करतात...."

**लेख** - पृ. ५७ : सागरतळ खरवडून उजेडात आणलेले बांधकामाचे अवशेष महाभारतीय कृष्णाच्या द्वारकेचेच आहेत असले आग्रह धरणारांना या उताऱ्यात सावधानीची सूचना दिली आहे.

हे वाक्य डॉ. दांडेकरांच्या उताऱ्यानंतर आले आहे. यात 'टिंगल' कुठे आली?

**टि. ७** — "सत्यवतीच्या शोधाचा एवढा ऊहापोह करून खैरेंच्या हाती काय लागते? ती कोळीण नसून राजकन्या होती, 'आर्य' होती. मुळात शोधच चुकीच्या मार्गाचा आहे."

**लेख** - पृ. ५६ : खरे तर महाभारतीय सत्यवतीच, 'म्हटलं तर राजाची, म्हटलं तर अप्सरेची, म्हटलं तर मासळीची, म्हटलं तर कोळ्याची... मुलगी' आहे. इतक्या जीवनावस्थांमधून गेलेले कथापात्र मानवी व्यक्ती म्हणून काव्यात दाखवले असले तरी त्याच्या सत्यसृष्टीतल्या अस्तित्वाची कल्पनासुद्धा करता येत नाही.

यावरून टि. ७ मधील विधान पूर्णपणे चुकीचे आहे हे दिसून येईल.

लेखातली विधाने विपर्यस्त स्वरूपात मांडून टिप्पणी सिद्ध आणि प्रसिद्ध झाली असल्यामुळे तिची अधिक चर्चा करण्याची गरज वाटत नाही. एवढ्याशा लेखाचे आकलन जर टीका करण्याआधी होऊ शकत नसेल तर, लक्ष-महाभारताचे 'आधी आकलन, मग अर्थन' व्हावे, हे लेखातले मागणे कसे पुरे होणार?

*विश्वनाथ खैरे*
३७४ सिंध सोसायटी, औंध, पुणे ४११ ००७



**लेखक-परिचय**

- **अम्लान दत्त** : अर्थशास्त्राचे नामवंत प्राध्यापक; नॉर्थ बेंगॉल युनिव्हर्सिटी व विश्वभारती (विद्यापीठ), शांतिनिकेतन,चे भूतपूर्व कुलगुरू; आर्थिक, शैक्षणिक, सामाजिक, राजकीय विषयांवर प्रबोधनपर विपुल लेखन; *पर्स्पेक्टिव्ह ऑफ इकॉनॉमिक डेव्हलपमेंट, सोशलिझम, डेमॉक्रसी अँड इंडस्ट्रियलायझेशन, द थर्ड मूव्हमेन्ट, द गांधीयन वे, बियॉंड सोशलिझम* इ. ग्रंथांचे कर्ते. **पत्ता** : पूर्वपल्ली (उत्तर), शांतिनिकेतन ७३१ २३५, प. बंगाल.
- **टी.बी. खिलारे** : अंधश्रद्धा निर्मूलन समितीचे एक प्रमुख कार्यकर्ते; *अंनिस वार्तापत्राच्या* संपादक मंडळाचे सभासद. **पत्ता** : २३ I७ शिंदे नगर, बावधन, पुणे ४११ ०२१.
- **कुंदर दिवाण** (क.व. दिवाण) : आचार्य विनोबा भावे यांच्या आश्रमात अध्ययन; ग्राम सेवा मंडळ, नालवाडी (वर्धा) या संस्थेत अनेक वर्षे सेवा व प्रबोधन कार्य; संस्कृत वाङ्मय, धर्म, तत्त्वज्ञान यांचा व्यासंग; *सेवक* या सर्वोदय विचारास वाहिलेल्या मासिकाचे संपादन; *हिमालयाची हांक, धम्मपद* (पद्य अनुवाद), *श्रीविष्णुसहस्रनाम चिंतनिका* इत्यादी ग्रंथांचे कर्ते. **पत्ता** : २०१, 'मंगेश', जे-३, लक्ष्मीनगर, नागपूर ४४० ०२२.
- **संजीवनी कुलकर्णी** : वैद्यक विषयातील (ॲलोपथी) पदवी; एड्स रोगविषयक अभ्यास-प्रबोधन प्रकल्पात सहभाग, *पालकनीती* या नियतकालिकाचे संपादन, *अक्षरनंदन* या प्रयोगशील शाळेच्या शाळासमितीच्या सभासद; पालकत्व, शिक्षण, समाज प्रबोधन या विषयांवर विपुल लेखन व प्रत्यक्ष कार्य. **पत्ता** : अमृता क्लिनिक, संभाजी पूल कोपरा, डेक्कन जिमखाना, पुणे ४११ ००४.
- **नीलम हातेकर** : मराठीच्या प्राध्यापिका, किसन वीर महाविद्यालय, वाई; *नवभारत* व अन्य नियतकालिकांमधून समीक्षापर लेखन. **पत्ता** : ३-व, ग्रीन व्हॅली, पाचगणी, (जि. सातारा) ४१२ ८०५.

